शक्य तर या स्पर्धेत सरकारास पराभूत करण्याची खाजगी धंदेवाल्यांस पूर्ण मुभा असावी. अशा सरकारी कारखान्यांत व दुकानांत चांगला व नमुनेदार अधिकृत माल बनविण्याची व विकण्याची व्यवस्था करावी. तेथें मिळणारा माल शुद्ध व खरा असा असावा व काम चोख असावें. असें केल्यानें सरकारनें ठरवलेली किंमत देण्याची आपली तयारी असल्यास आपणांस निर्भेळ खाद्य, निर्भेळ पेय व निर्भेळ काम मिळण्याची शाश्वति लोकांस वाटूं लागेल.

( ३ ) एकादा पुरुष, स्त्री, मुलगा अथवा मुलगी बेकार आढळल्यास त्यांना नजिकच्या सरकारी शिक्षणसंस्थांत नेऊन जें काम करण्यास तो किंवा ती लायक असल्याचें आढळून येईल, तें त्यांना ठराविक वेतन देऊन करावयास लावावें. या वेतनाचे दर दरसाल ठरविण्यांत यावेत. अडाणीपणामुळें त्यांना काम करतां येणें शक्य नसल्यास त्यांना त्याचें शिक्षण द्यावें. आजारामुळें काम करणें शक्य नसल्यास त्यांच्या शुश्रुषेची व्यवस्था करावी. पण काम करण्याची त्यांची इच्छाच नसेल तर समाजाला उपयुक्त अशीं अधिक कष्टांचीं व हीन गणलेलीं कामें त्यांच्या-कडून कठोर शिस्तीनें करवून घ्यावींत. विशेषतः खाणींतील व इतर धोक्याच्या जागेतील कामें त्यांस देण्यांत यावींत. ( मात्र या कामांतील धोका काळजीपूर्वक बनविलेल्या नियंत्रणांनीं व कामांतील शिस्तीनें शक्य तितका कमी करण्यांत यावा. ) या कामांचा जो योग्य मोबदला असेल त्यांतून सक्ती करण्यासाठीं सरकारला पडलेला खर्च वजा करून उरलेली रक्कम त्यांच्या नावें ठेवून द्यावी आणि काम करण्यासंबंधीची त्यांची वृत्ति सुधारल्यानंतर ती त्यांना देण्यांत यावी.

( ४ ) जे वृद्ध आणि निराश्रित असतील त्यांच्या सुखाची आणि आश्रयाची व्यवस्था सरकारनें करावी. वरील सर्व सूचना अमलांत आणिल्यानंतर गुन्हेगारी आणि दुर्दैवाचे आघात यांचीं फळें पृथक्‌रणें

लोकनिदर्शनास येतील व म्हणून अशा प्रकारच्या सरकारी व्यवस्थेचा उपयोग करून घेण्यात कोणासहि मानहानि वाटणार नाहीं, किंबहुना मानच वाटेल. “कारण ज्याप्रमाणें मध्यम वर्गांतील लोक तरवारीनें, लेखणीनें अथवा वैद्यकीय चाकू चालवून समाजाची सेवा करीत असतात, त्याच-प्रमाणें मजूरवर्गहि आपल्या खोऱ्याकुदळीनें आपल्या देशाची सेवा करीत असतो. जर हें काम कमी महत्त्वाचें असेल व म्हणून निरोगी असतांना त्याला या कामाचा मोबदला कमी मिळत असेल, तर त्याची प्रकृति ढांसळली असतां त्याला मिळणारें वेतनहि कमी असावें, पण त्यांत मानहानी नसावी. आपल्या देशाची चांगली सेवा केल्याबद्दल वरिष्ठ वर्गांतील लोकांना वृद्धवेतन (पेन्शन्) मिळावें हें जितकें सरळ आणि स्वाभाविक आहे, तितकेंच एकाद्या मजुराला आपल्या गांवची चांगली सेवा केल्याबद्दल वृद्धवेतन मिळालें पाहिजे हेंहि स्वाभाविक व सरळ आहे.” **कलेचें अर्थशास्त्र** या माझ्या पुस्तकांतील हा उतारा उद्धृत केला आहे. या विषयाचें अधिक स्पष्टीकरण त्या पुस्तकांत वाचकांस आढळेल.

वरील उताऱ्यास पूरक असें एकच विधान मी येथें करतों की, ज्याप्रमाणें व्हेलेरिअस पब्लिकोला या रोमन राष्ट्रभक्ताची समाधी सार्व-जनिक निधींतून बांधण्यांत आली व तिच्यावर तसें लिहूनहि ठेवण्यांत आलें, तरी त्यात कोणत्याहि प्रकारें त्याचा अपमान झाला असें मानिलें गेलें नाहीं, त्याचप्रमाणें वरिष्ठ किंवा कनिष्ठ कोणत्याहि दर्जाच्या मनुष्यास जिवंत असेपर्यंत अथवा मेल्यानंतर आपल्या सेवेचें वेतन समाजाकडून घेण्यात कमीपणा वाटण्याचें कारण नाहीं.

अशा प्रकारची माझी मतप्रणाली आहे आणि याच विचारांचें स्पष्टीकरण उदाहरणें देऊन त्यांच्या निरनिराळ्या स्वरूपांत शक्य तितक्या प्रमाणांत मी करणार आहें. यांतून उद्भूत होणाऱ्या आनुषंगिक विषयांचाहि मी

विचार करीन. माझ्या अंतिम निर्णयासंबंधीं वाचकांना भीति वाटूं नये याचसाठीं हे निष्कर्ष येथें संक्षिप्त रूपानें मांडण्यांत आले आहेत. तथापि माझे ह्या विषयावरील विचार वाचीत असतां एक गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवण्याची मी वाचकांस विनंति करूं इच्छितों; ती म्हणजे मनुष्य स्वभावा-सारख्या अत्यंत सूक्ष्म तत्त्वांनीं बनलेल्या विषयांशीं ज्याचा संबंध येतो, अशा शास्त्रांत जे सिद्धांत मांडलेले असतात, त्यांच्या अंतिम सत्यतेबद्दल जितका निर्वाळा देतां येईल तितका या सिद्धांतांच्या आधारें बनविलेल्या योजनांच्या प्रत्यक्ष यशस्वितेबद्दल देतां येणार नाहीं. तसेंच या योजनांपैकीं अगदीं उत्कृष्ट अशा योजनेसंबंधींहि ताबडतोब किती भाग अमलांत आणतां येईल, हा प्रश्न नेहमींच विवाद्य किंवा संशयास्पद असणार आणि अंतीं ती योजना कितपत साध्य होईल याची तर कोणास कल्पनाहि करितां येणार नाहीं.

डेन्मार्क हिल्,
१० मे १८६२.

---

# अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ?

## निबंध १ ला

### सन्मानाचें मूळ.

निरनिराळ्या वेळीं मानवकुलांतील बहुजन समाजाच्या बुद्धीला ग्रासून टाकणारे अनेक भ्रम निर्माण होत असतात. शास्त्र म्हणून मिरवूं पाहणारें आधुनिक अर्थशास्त्र हा एक असाच अत्यंत विलक्षण व निःसंशय लाजिरवाणा असा बुद्धि-भ्रम आहे. मनुष्याच्या समाजभावनेचे त्याच्या सामाजिक व्यवहारांवर काय परिणाम घडतात, इकडे दुर्लक्ष करून सामाजिक वर्तनाचे फायदेशीर नियम बनवितां येतील, या कल्पनेवर हें शास्त्र आधारलेलें आहे.

किमया, फलज्योतिष, चेटुकविद्या आणि यासारख्याच लोकप्रिय बनलेल्या इतर शास्त्रांच्या बुडाशीं जशा कांहीं भ्रामक कल्पना असतात, तशी या शास्त्राच्या बुडाशींहि अर्थात् एक कल्पना आहे. हे अर्थशास्त्रज्ञ म्हणतात, "समाजभावना ही मनुष्यस्वभावाची अपवादभूत अशी विकृति आहे. पण लोभ आणि प्रगतिप्रियता हे त्याचे नित्यघटक आहेत. म्हणून त्यांतील अनित्य घटकांकडे दुर्लक्ष करूं या; आणि मनुष्यप्राणी हें एक लोभप्रेरित यंत्र आहे, असें गृहीत धरून कामाचे आणि खरेदीविक्रीचे कोणते नियम अनुसरिले असतां अधिकांत अधिक धनसंचय करितां येईल तें पाहू या. एकदां हे नियम निश्चित झाले म्हणजे त्यांत बिघाड करणाऱ्या समाजभावनेच्या घटकाचें आपल्या व्यवहारांत किती प्रमाणांत मिश्रण करावयाचें हें ज्या त्या व्यक्तीनें ठरवावें आणि तदनुसार या नव्या मिश्रणामुळें आपल्या वर्तनाचें कोणतें फळ मिळेल, त्याचा अंदाज बांधावा."

अपवादभूत म्हणून प्रथम अलग केलेले आणि नंतर विचारांत घ्यावयाचे असे जे मनुष्यस्वभावाचे घटक, त्यांचें स्वरूप प्रथमतः विचारांत घेतलेल्या घटकांच्या स्वरूपासारखेंच असतें, तर पृथक्करणपूर्वक विवेचन करण्याची ही विचारपद्धति पूर्णपणें तर्कशुद्ध आणि यशस्वी ठरली असती. समजा कीं, कांहीं नित्य आणि कांहीं अनित्य अशा शक्तींच्या प्रेरणेनें हालणाऱ्या एकाद्या जड पदार्थाच्या गतीचा मार्ग आपणांस अंदाजावयाचा आहे. अशा वेळीं त्याला नित्य प्रेरणा देणाऱ्या शक्तींच्या प्रभावानें त्याची गति कोणत्या दिशेनें किती होईल, त्याचें गणित प्रथम करतात व नतर अनित्य स्वरूपाच्या प्रेरकशक्तीमुळें त्यांत किती फेरबदल होतील याचा विचार करतात. अशा प्रकारची उदाहरणें सोडविण्यास ही नेहमींची अत्यंत सोपी रीत आहे. पण सामाजिक प्रश्नांचा विचार करीत असतां ज्यांचें विवेचन करावें लागतें असे मनुष्यस्वभावांतील नित्य व अनित्य घटक एकाच प्रकारचे नसतात. त्या अनित्य तत्त्वांचा संचार होतांच ज्या प्राण्याच्या व्यवहारांचें आपण निरीक्षण करीत आहोंत त्यांचा मूळ स्वभावच बदलून जातो. त्यांची क्रिया गणिती पद्धतीनें न घडतां रासायनिक पद्धतीनें घडत असते, म्हणजे त्यांच्या संयागानें अशी एक नवी परिस्थिति निर्माण होते कीं,

तिच्यामुळें आपलें पूर्वींचें सर्वच ज्ञान निरुपयोगी ठरतें. कल्पना करा कीं, शुद्ध नैट्रोज्न वायूचे आपण अनेक प्रयोग केले, आणि त्याच्याशीं आपण अगदीं सहज व्यवहार करू शकतों अशी आपली खात्री करून घेतली. नंतर त्याच ज्ञानावर आपण त्याच्या क्लोराइडचे प्रयोग करण्यास सुरवात केली, तर काय चमत्कार घडतो पहा. आपण सिद्ध केलेल्या नियमांनुसार हा प्रयोग करूं लागतांच एक मोठा स्फोट होईल व आपल्या प्रयोग-साधनासहित डोक्यावरील छपरांतून आपण उडून जाऊं.

जर त्यांतील गृहीतकृत्ये मान्य केलीं, तर त्यावरून या शास्त्राचे जे निष्कर्ष निघूं शकतात, त्याबद्दल मी संशय किंवा शंका प्रदर्शित करीत नाहीं, हें लक्षांत ठेवा. मनुष्यमात्रांना मुळीं हाडेंच नाहींत, असें गृहीत धरून जर एकाद्यानें एकादें कसरतशास्त्र बनविलें, तर त्या शास्त्राच्या ज्ञाना-संबंधीं जितका मी अनुत्सुक असेन, तितकाच मी या अर्थशास्त्रीय सिद्धांतासंबंधींहि उदासीन आहें. वरील कसरतशास्त्रांतील गृहीतकृत्य खरं धरल्यास, तें शिकणाऱ्या विद्यार्थ्यांचे चेंडूसारखे गोळे बनवणें किंवा घडी केलेल्या वस्त्राप्रमाणें तें जमिनीवर पसरणें किंवा त्यांना ताणून त्यांच्या शरीराच्या दोऱ्या विणणें, या गोष्टी त्यांना फायदे-शीर आहेत, असें दाखवून देतां येईल आणि असें केल्यानंतर अशा प्रकारच्या शरीरव्यापारांत अनेक अडथळे उत्पन्न करणारीं हाडें त्यांना आहेत, या ज्ञानाची भर जर आपण पूर्वी बनवलेल्या सिद्धांतांत टाकूं लागलों, तर कशी काय स्थिति होईल? आपले युक्तिवाद प्रशंसनीय असूं शकतील, आपण काढलेले निष्कर्षहि तर्कशुद्ध असतील, मात्र अव्यवहार्यता हा एकच दोष त्या शास्त्रांत राहील. अगदीं ततोतंत अशाच सारख्या पायावर आधुनिक अर्थशास्त्राची उभारणी झालेली आहे. मनुष्यमात्रांना हाडेंच नाहींत असें त्यांत गृहीत धरलेलें नाहीं, पण हाडांच्या सांपळ्याहून अधिक असें मनुष्यजीवनांत कांहींच नाहीं, म्हणजे त्याला आत्मा नाहीं असें गृहीत धरून त्याला केवळ हाडांचा सांपळा बनवणारी त्याच्या प्रगतीची एक उपपत्ति या शास्त्रानं बसविली आहे. त्याच्या डोकीची कवटी आणि दंडाचीं हाडें यांच्यापासून भूमितीशास्त्रा-नुसार निरनिराळ्या आकृती कशा बनवाव्यात, यासंबंधीं चित्तवेधक असे

सिद्धांत या शास्त्रानें निर्माण केले आहेत. पण या चैतन्यशून्य शरीराच्या सांगड्यांत आत्म्यानें पुन्हा संचार केला असतां, त्या शरीराची कशी त्रेधातिरपिट उडते तेंहि हें शास्त्र यशस्वीपणानें सिद्ध करीत आहे. या उपपत्तींतील सत्य मी नाकारीत नाहीं; मी येवढेंच म्हणतों कीं, वास्तविक जगाच्या विद्यमान स्वरूपास हें सत्य लागू पडत नाहीं.

नुकत्याच झालेल्या संपांमुळे सर्वत्र गोंधळ उडून गेला असतां ही उपपत्ति व्यवहारांस कशी लागू पडत नाहीं, तें मोठ्या विलक्षण प्रकारें निदर्शनास आलें आहे. अर्थशास्त्रांत ज्या जिव्हाळ्याच्या प्रश्नांचा विचार करावा लागतो, अशा प्रश्नांपैकीं हा ( मजूर-मालकांच्या संबंधाचा प्रश्न ) पहिल्या प्रतीचा असून त्याचें हें अगदी साधें, यथायोग्य आणि निर्णायक स्वरूपाचें एक उदाहरण म्हणून देतां येईल. हजारोंच्या जीवितांस आणि लक्षावधी रुपयांच्या संपत्तीस धोका उत्पन्न होणाऱ्या या गंभीर सामाजिक अरिष्टाच्या प्रसंगीं अर्थशास्त्रज्ञ अगदीं असहाय आणि जवळजवळ निःशब्द बनले होते. या अडचणींतून मार्ग कसा काढावा याचे दोन्ही विरोधी पक्षांना पटेल व त्यांना शांत करील असें कोणतेंहि प्रत्यक्ष प्रमाण-सिद्ध उत्तर ते देऊं शकत नाहीत. अशा वेळी या प्रश्नाकडे मालक दुराग्रहानें केवळ आपल्याच दृष्टिकोणांतून पहात असतात आणि कामकरीहि त्याकडे तितक्याच आग्रही वृत्तीनें भिन्न दृष्टिकोणानें पहात असतात. अशा स्थितींत कोणत्याहि अर्थशास्त्राला त्यांचा सलोखा घडवून आणता येणार नाहीं.

तसें घडेल तरच तें आश्चर्य होईल. कारण एकाद्या शास्त्राच्या साहाय्यानें मनुष्यांमधील सलोखा घडून यावा अशी मुळी सृष्टीची योजनाच नाहीं. या प्रसंगीं एकामागून एक असे अनेक विवादपटू पुढें सरसावतात आणि मालकांचे व मजुरांचे हितसंबंध परस्परांशी विरुद्ध आहेत किंवा नाहींत, यासंबंधीं व्यर्थ वाद करूं लागतात. पण मनुष्यांचे हितसबंध परस्परांशीं विरुद्ध असले, म्हणून त्यांनी एकमेकांचें शत्रुत्वच करावें असें सर्वच स्थितींत अथवा सर्वच काळीं सिद्ध होत नाहीं, या गोष्टीची त्यांच्यापैकीं एकासहि आटवण नसावीशी दिसते. घरांत एकच भाकरीचा तुकडा असला आणि त्यांत राहणारी आई व मुलें दोघेहि

उपाशी मरत असलीं तर त्यांचे हितसंबंध अविरोधि नसतात. जर आईनें तो तुकडा खाल्ला तर तो मुलांना मिळणार नाहीं, आणि मुलांनीं खाल्ला तर आईला उपाशीपोटीं कामावर जावें लागेल. तथापि यावरून असें निश्चितपणें सिद्ध होत नाहीं कीं, त्याच्यांत विरोध उपस्थित होईल, तीं त्या तुकड्यासाठीं एकमेकांशी भांडूं लागतील आणि आई अधिक बलिष्ठ असल्यामुळें तो तुकडा हिसकावून घेऊन खाऊन टाकील. तसेंच व्यक्तिमात्रांचे संबंध कशाहि प्रकारचे असले तरी आपले हितसंबंध विरोधी आहेत म्हणून, ते एकमेकांकडे शत्रुभावनेनेंच पाहतील अथवा आपला स्वार्थ साधण्यासाठी अत्याचार आणि लुच्चेगिरी यांचाच आश्रय करतील, असें दुसऱ्या कोणत्याहि उदाहरणांतदेखील निश्चितपणें गृहीत धरतां येणार नाहीं.

तथापि वस्तुस्थिति तशीच असून मनुष्यांची नीति उंदरांच्या किंवा डुकरांच्या नीतिशास्त्राहून यत्किंचित्‌हि भिन्न नाहीं असें समजणें सोइस्कर तसेंच न्याय्य समजलें तरीहि त्यावरून कोणता निष्कर्ष निघेल हें तर्कदृष्ट्या निश्चित सांगतां येण्यासारखें नाहीं. मालकांचे आणि मजुरांचे हितसंबंध विरोधी किंवा अविरोधी असतात, यांपैकीं कोणतेंहि विधान सामान्यत्वें कधीहि करतां येणार नाहीं; कारण परिस्थितिभेदानुसार ते दोनहि प्रकारचे असूं शकतात. धंदा योग्य प्रकारें चालूं रहावा आणि मालाला न्याय्य किंमत मिळावी, यांत नेहमीं दोघांचेंहि हित असतें हें खरें; पण नफ्याची वांटणी करून घेताना एकाला होणारा फायदा हें दुसऱ्याचें कित्येक वेळां नुकसान असूं शकेल किंवा नसेलहि. कामगार रोगट व हताश राहतील इतकें कमी वेतन देणें हें मालकांच्या हिताचें होऊं शकत नाहीं. तसेंच मालकांचा नफा कमी होऊन ते आपल्या धंद्याची वाढ करूं शकणार नाहींत, अथवा आपला धंदा निश्चितपणें व उदार बुद्धीनें चालवूं शकणार नाहींत, इतकी पगारवाढ कामगारांच्या हिताची ठरणार नाहीं. इंजिनाचीं चक्रें दुरुस्त ठेवण्याइतकीहि कंपनीची सुस्थिति नसेल तर त्यांत कोळसे घालणाऱ्या मजुरांनीं मोठा पगार मिळण्याची इच्छा करतां कामा नये.

परस्परांच्या हितसंबंधांवर परिणाम घडविणाऱ्या परिस्थितींचे इतके अनंत प्रकार असूं शकतात कीं, केवळ नफ्यातोट्याचा ताजवा हातांत धरून

त्या सर्व परिस्थितींना लागू पडणारे वर्तनांचे नियम बनविण्याचा प्रयत्न करणें निष्फळ आहे; आणि हा प्रयत्न निष्फळ व्हावा अशीच सृष्टीची योजना आहे. कारण मनुष्यमात्रांनी आपले सर्व व्यवहार नफ्यातोट्याच्या ताजव्यांत जोखून न करतां ते न्यायाच्या ताजव्यांत जोखूनच करावेत, असाच त्यांच्या विधात्याचा उद्देश आहे. म्हणून नफातोटा ठरविण्याचे सर्व प्रयत्न नेहमींच निष्फळ व्हावेत, अशी योजना त्यानें केली आहे. विशिष्ट प्रकारच्या वर्तनाचे स्वतःवर अथवा इतरांवर अंतिम दृष्ट्या कोणकोणते परिणाम घडतील, हें कोणाहि मनुष्यास कधीहि सर्वस्वी समजलें नाहीं व समजूं शकत नाहीं; पण कोणतें वर्तन न्याय्य आहे व कोणतें अन्याय्य आहे, हें मात्र आपणापैकीं प्रत्येकास समजूं शकेल व बहुतेकांस समजतेंहि; तसेंच आपणांस हेंहि समजूं शकतें कीं, न्यायाचे परिणाम आपल्या व इतरांच्या दृष्टीनेंहि शक्य तितके उत्तमच होतील; मात्र उत्तम म्हणजे काय व तें कसें घडून येईल, हें आपणांस सांगतां येणार नाहीं.

वर मी 'न्यायाचा ताजवा' असे शब्द योजिले आहेत व न्याय या शब्दांत सद्भावनेचाहि अंतर्भाव केला आहे. मनुष्यांनी परस्परांसंबंधीं सद्भावना धारण करणें, हें त्यांचें कर्तव्यच आहे. मालक आणि मजूर यांच्यांतील न्याय्य संबंध आणि त्यांचे सर्वश्रेष्ठ हितसंबंध अंतिम दृष्ट्या त्यावरच अवलंबून असतात.

मालक आणि नोकर यांच्यामधील संबंधांचें अगदीं साधें आणि उत्कृष्ट उदाहरण घरगुती नोकरांच्या बाबतींत आपणांस आढळतें.

आपण अशी कल्पना करूं कीं, एक गृहस्थ आपण दिलेल्या वेतनाचा मोबदला म्हणून आपल्या नोकरांकडून जास्तींत जास्त काम करवून घेऊं इच्छित आहे. तो त्यांना कधीहि रिकामे बसूं देत नाहीं; ते चालवून घेतील इतकें वाईट अन्न व खराब जागा त्यांना देतो, आणि ते आपली नोकरी सोडून जाणार नाहीत, एवढी एकच मर्यादा सांभाळून त्यांच्याकडून शक्य तेवढीं आपलीं कामें करवून घेतो. असें करण्यांत सामान्य लोक ज्याला "न्याय" म्हणतात, त्याचें तो उल्लंघन करीत नाही. नोकरानें आपला सर्व वेळ आणि सर्व शक्ति त्याला देण्याचें कबूल केलेलें असतें, आणि तीं तो घेत असतो. असें करीत असतां नोकरांशीं किती कठोरपणानें वागावें,

याची मर्यादा आसपासच्या इतर मालकांच्या वागणुकीच्या पद्धतींवरून ठरविली जाते; म्हणजेच घरगुती कामाच्या कष्टाचा मोबदला चालू बाजारभावानुसार ठरविण्यांत येतो. नोकराला जर अधिक चांगली नोकरी मिळाली, तर ती धरण्यास त्यास मुभा असते आणि त्याच्या श्रमाचा भाव ठरवितांना आपणांस याच्यापासून जास्तींत जास्त किती काम करवून घेतां येईल, तें पाहून मालकांनीं तो ठरवावयाचा असतो.

अर्थशास्त्री पंडितांच्या मतानुसार या प्रकरणाचा विचार करण्याची हीच शास्त्रीय दृष्टि होय. ते म्हणतात कीं, या पद्धतीनें वागल्यास नोकरांच्या कामाचें सरासरी प्रमाण जास्तींत जास्त पडतें आणि म्हणून या पद्धतीमुळें समाजाचा अधिकांत अधिक फायदा होतो आणि अखेरीस त्या नोकरासहि त्यांतील अंश मिळतो.

तथापि वस्तुस्थिति अशी नाहीं. जर हा नोकर म्हणजे वाफेनें, चुंबकशक्तीनें, गुरुत्वाकर्षणानें अथवा अशाच एकाद्या मोजमाप करता येणाऱ्या शक्तीनें चालणारें यंत्र असतें तर तसें घडलें असतें. पण याच्या उलट आत्म्याच्या प्रेरक शक्तीनें चालणारें असें एक यंत्र तो असल्यामुळें ही विलक्षण शक्ति एकाद्या अज्ञात संख्येप्रमाणें, अर्थशास्त्रज्ञांना नकळत त्यांनीं बनविलेल्या सर्व समीकरणात प्रविष्ट होऊन त्यांचे सर्व निष्कर्ष खोटे ठरवीत असते. हें यंत्र असें विलक्षण आहे कीं, त्याला मिळणारा पगार, त्याच्यावर घातलेलें दडपण अथवा त्यांत घमेल्यांनीं ओतलेला कोळसा किंवा दुसरें सरपण, यांच्यामुळें ते अधिकात अधिक काम देत नाही. जेव्हां त्याला प्रेरणा देणारी इच्छाशक्ति अथवा त्या प्राण्याची चेतनशक्ति अनुरूप असें इंधन मिळून प्रज्वलित होईल, तेव्हांच तें जास्तींत जास्त काम देतें. हें इंधन म्हणजे त्याला दाखवली जाणारी सद्भावना.

जर एखादा धनी शहाणा आणि उद्योगी असेल, तर तो आपल्या करारी बाण्यानें आणि शहाणपणाच्या शिस्तीच्या बाह्य दडपणानें आपल्या नोकरांकडून भौतिकदृष्ट्या पुष्कळसें काम करून घेईल हें खरें आहे व पुष्कळ वेळां तसें घडतेंहि. याच्या उलट धनी आळशी आणि दुबळा असला ( मग तो कितीहि सुस्वभावी असो ) तर नोकरांच्या शक्तीला योग्य दिशा न लागल्यान काम थोडें व तेंहि वाईट होईल व अशा

मालकाबद्दल नोकरांस कृतज्ञता वाटली तरी ते त्याला तुच्छच लेखतील, असें घडणें शक्य आहे व तसें पुष्कळ वेळां घडतेंहि. पण या बाबतींतील सार्वत्रिक सिद्धांत असा आहे की, मालकाच्या व नोकराच्या अंगीं शहाणपणाचें व उद्योगीपणाचें विशिष्ट प्रमाण गृहीत धरल्यास, जेव्हां त्या दोघांमध्यें विरोधी भावना जागृत असतात तेव्हां नव्हे, तर ज्या वेळीं त्यांच्यामध्यें सद्भावना नांदत असतात, त्याच वेळीं भौतिकदृष्ट्या अधिकांत अधिक काम उठतें, आणि जर नोकरांकडून अधिकांत अधिक काम चोपून घेण्याचा प्रयत्न करण्याऐवजीं त्यांस नेमून दिलेलें आवश्यक काम त्यांना हितप्रद होईल, अशी मालक व्यवस्था करील आणि सर्व न्याय्य आणि हितप्रद मार्गांनी नोकरांच्या हिताचें संवर्धन करील, तर अशा आपुलकीनें वागविलेल्या नोकरांकडून अंतीं जास्तींत जास्त काम घडेल अथवा त्याच्यापासून मालकाचें अधिकांत अधिक हित होईल.

लक्षांत घ्या कीं, मालकाचें अधिकांत अधिक हित असें मीं म्हटलें आहे. कारण नोकरांकडून केलें जाणारें काम हीच काय ती मालकाच्या पदरांत पडणारी एकच किंवा नेहमींची बहुमोल वस्तु नव्हे. नोकरांपासून होणाऱ्या मालकाच्या हितांत अनेक प्रकारच्या गोष्टींचा अंतर्भाव होत असतो. कधीं भौतिकदृष्ट्या अधिक काम करून, कधीं धन्याच्या हिताचें व पतीचें दक्षतेनें संरक्षण करून, तर कधीं मधुनमधून उद्भवणाऱ्या अनपेक्षित प्रसंगीं सहाय्य करण्याची संधी आनंदानें साधण्यांत तत्पर राहून नोकर मालकाचें हित करू शकतात.

पुष्कळ वेळां नोकरांना दिलेल्या सवलतींचा दुरुपयोग होतो आणि त्यांना दाखविलेल्या औदार्याला कृतघ्नतेचें उत्तर मिळतें, पण येवढ्यानें या सिद्धांतास यत्किंचित्‌हि बाध येत नाहीं. कारण जो नोकर सौम्यपणानें वागविलें असतांहि कृतघ्न बनतो, त्याला जर कठोरपणानें वागविलें तर तो खुनशी बनेल आणि आपल्या उदार धन्याशीं जो अप्रामाणिकपणें वागतो तो अन्यायी धन्याचें नुकसान करण्यासच प्रवृत्त होईल.

**म्हणून कोणत्याहि परिस्थितींत आणि कोणत्याहि माणसाशीं वागावयाचें असलें, तरी निःस्वार्थी वर्तन ठेवल्यानेच अधिकांत अधिक फल प्रत्यक्ष पदरांत पडेल. येथें सद्भावना ही एक कर्मप्रेरक शक्ति आहे या दृष्टीनेंच**

केवळ मी विचार करीत आहें. ही भावना स्वभावतःच इष्ट, उदात्त अथवा केवळ तात्त्विक दृष्ट्या सर्वथा श्रेष्ठ आहे, या दृष्टीनें मी विचार करीत नाहीं. सामान्य अर्थशास्त्रज्ञांचे हिशेबी गणित खोटें ठरविणारी ती एक विलक्षण शक्ति आहे, येवढ्याच दृष्टीनें मी तिच्याकडे पहात आहें. आपल्या अंदाजात या शक्तीमुळें काय फेरबदल करावे लागतील, त्याचा मागाहून विचार करण्याचें जरी त्यांनीं ठरविलें, तरीहि तिचे परिणाम अंदाजण्याची त्यांच्याजवळ ताकद असणार नाहीं. कारण ही भावना जेव्हां कार्य करूं लागते, तेव्हां इतर प्रेरकशक्ती आणि अर्थशास्त्रज्ञांचीं गृहीतकृत्यें यांना विरोधी असेंच तिचें कार्य घडत असतें. आपल्या नोकरांच्या कृतज्ञतेमुळें आपला फायदा व्हावा या बुद्धीनें जर तुम्ही त्यांना उदारपणें वागवूं लागला, तर ते तुमच्याशीं कृतज्ञ राहणार नाहींत व तुमच्या औदार्यालाहि किंमत देणार नाहींत. तुमच्या वृत्तीच्या दृष्टीनें हें फल योग्यच ठरेल. पण सर्व आर्थिक हेतू बाजूस ठेवून जर तुम्ही त्यांना उदारतेनें वागवूं लागला तर तुमचें आर्थिक हित आपोआप सिद्ध होईल. जीवनाचा लोभ धरल्यानें तें गमावतें आणि त्याचा त्याग केल्यानेंच जीवन लाभतें, हा सार्वत्रिक नियम येथेंहि लागू पडतो.

धनी आणि चाकर यांच्यांतील संबंधाचें दुसरें अगदीं साधें आणि स्पष्ट उदाहरण म्हणून सेनापति आणि त्याचे सैनिक यांच्यांतील परस्पर-संबंधाचें देतां येईल. आपणांस कमींत कमी दगदग पडून आपल्यां सैन्यानें अधिकांत अधिक पराक्रम गाजवावा, या दृष्टीनें आपल्या सैन्याला शिस्त लावण्याचा प्रयत्न एकादा अधिकारी करीत आहे अशी कल्पना करा. शिस्तीचे कितीहि नियम बनविले अथवा त्यांची कशीहि बजावणी केली तरी तेवढ्यानें आपल्या सैनिकांची शक्ति तो पूर्णपणें जागृत करूं शकत नाहीं. तो शहाणा आणि कडक असला, तर मागच्या उदाहरणांत दाखवून दिल्याप्रमाणें सदय पण दुबळ्या व लहरी अधिकाऱ्यापेक्षां आपल्या आंगच्या गुणांनीं अधिक परिणाम घडवून आणूं शकेल. पण दोघांच्या अंगीं शहाणपण आणि दृढनिश्चय यांचें प्रमाण सारखेंच असल्यास जो अधिकारी आपल्या अनुयायांची निष्ठा संपादन करील, त्यांच्या हिताची

विशेष काळजी वाहील, आणि त्यांच्या जीविताला अत्यंत मूल्यवान् समजेल तोंच आपल्याविषयींच्या त्यांच्या प्रेमामुळें आणि आपल्या चारित्र्यावरील त्यांच्या निष्ठेमुळें त्यांच्या ठायीं मोठें सामर्थ्य निर्माण करूं शकेल. हें असें सामर्थ्य इतर कोणत्याहि उपायांनीं निर्माण करतां येणार नाहीं. सैन्यांतील सैनिकांची संख्या जितकी अधिक असेल तितक्या प्रमाणांत हा सिद्धांत अधिक तंतोतंत खरा ठरेल. एकादा लहानसा हल्ला सैनिकांचें आपल्या सेनापतीवर प्रेम नसतांनाहि पुष्कळ वेळां यशस्वी होऊं शकेल, पण सैनिकांचें सेनापतीवर प्रेम असल्याखेरीज मोठ्या लढाईत यश मिळाल्याचीं उदाहरणें क्वचित्‌च आढळतील.

या साध्या उदाहरणाकडून आता आपण कारखानदार आणि त्यांचे कामगार यांच्यामधील अधिक संकीर्ण संबंधांकडे वळूं. येथें प्रथमच आपणांस एक विलक्षण अडचण दिसूं लागते. या उदाहरणांत मनुष्यांच्या नैतिक भावना अगदीं कठोर व मंद बनलेल्या दिसतात. एकाद्या लष्करी अधिकाऱ्याबद्दल त्याच्या सैनिकांना उत्साही प्रेम वाटत आहे अशी कल्पना करणें अवघड नाहीं; परंतु एकाद्या सुताच्या गिरणींतील कामगारांना आपल्या गिरणीच्या मालकाबद्दल अशा प्रकारच्या प्रेमाचा उमाळा येईल अशी कल्पना करणें तितकेसें सोपें नाहीं. पूर्वीच्या काळांतील डोंगरकपारींतून राहाणाऱ्या एकाद्या रानटी टोळीप्रमाणें दरवडेखोरांच्या टोळींतहि पूर्ण प्रेमभावना नांदणें शक्य आहे व त्यांच्यांतील प्रत्येक व्यक्ति आपल्या पुढाऱ्याचा जीव बचावण्यासाठीं आपले प्राण देण्यास तयार होणें शक्य आहे. पण कायदेशीर मार्गांनीं धनोत्पादन व धनसंचय करण्यासाठीं संघटित झालेल्या लोकांत अशा भावना असल्याचें दिसत नाहीं; आणि त्यांच्यापैकीं कोणीहि आपल्या नेत्याच्या प्राणाचें रक्षण करण्यासाठीं कोणत्याहि प्रकारें आपले प्राण समर्पण करण्यास तयार असल्याचेंहि दिसत नाहीं. या प्रकरणांत हा एकच नैतिकदृष्ट्या विपरीत प्रकार आपल्या अनुभवास येतो असें नाहीं. तर अशाच प्रकारचे अनेक विपरीत प्रकार या संघटनापद्धतींत आपणांस आढळतात. घरगुती नोकर अथवा सैनिक यांचा पगार निश्चित ठरलेला असून त्यांची नोकरीची मुदतहि ठरलेली असते. पण गिरणींतील मजुरांच्या वेतनाचे

दर कामाच्या कमीअधिक मागणीप्रमाणें रोज बदलत असतात व व्यापाराच्या तेजीमंदीस अनुसरून आपली नोकरी गमावण्याची भीति त्यास प्रत्येक क्षणीं वाटत असते. अशा अनिश्चित परिस्थितींत मनुष्याच्या सद्भावना जागृत राहूं शकत नाहींत; उलट त्याच्यामधील द्वेषभावनांचाच स्फोट होणें शक्य असतें. म्हणून या प्रश्नाचा विचार करीत असतां पुढील दोन मुद्यांचा विचार करावा लागतो.

पहिला मुद्दा असा कीं, कामाच्या मागणीप्रमाणें मजुरीचे दर बदलूं नयेत अशा प्रकारें त्यांचें नियंत्रण करणें कितपत शक्य आहे.

दुसरा मुद्दा असा कीं, व्यापाराची स्थिति कशीहि असली तरी ठराविक वेतन देऊन मजुरांची संख्या कमीअधिक न करतां त्यांना कामावर ठेवणें कितपत शक्य आहे. असें करण्यांत हेतु हा कीं, एकाद्या जुन्या कुटुंबांतील नोकरास त्या कुटुंबाबद्दल ज्या प्रकारची आपुलकीची भावना वाटते अथवा सैन्यांतील एकाद्या उत्कृष्ट तुकडींत ज्या प्रकारची संघ-भावना जागृत असते, तशा प्रकारची भावना आपल्या कारखान्यासंबंधीं त्यांतील कामगारवर्गात सतत जागृत राहावी.

कामाची कमीअधिक मागणी लक्षांत न घेतां मजुरीचे दर ठरविणें कितपत शक्य आहे हा प्रश्न प्रथम उत्पन्न होतो असें मी म्हणतों. अशा प्रकारें मजुरीचे दर निश्चित करतां येणार नाहींत, हें सर्वसामान्य अर्थ-शास्त्रज्ञांचें मत हा मानवी इतिहासांतील भ्रामक मतांचा एक विलक्षण नमुना आहे. वस्तुतः जगांतील श्रेष्ठ प्रतीच्या सर्व कामांचे आणि सामान्य प्रतीच्या बऱ्याच कामांचेहि दर असे निश्चित ठरविलेले आढळतात.

आमच्या देशांतील पंतप्रधानांच्या कामाचा भाव जाहीर लिलाव पुकारून आम्ही ठरवीत नाहीं, अथवा एकादा बिशप मरण पावला असतां त्याच्या जागेवर कमींत कमी पगार घेऊन काम करण्याचा करार लिहून देणारास आपण ती जागा देत नाहीं. लष्करी हुद्दे विकण्याची नीति चाणाक्ष अर्थशास्त्रज्ञांपासून आम्ही शिकलों असलों, तरी सेनापती-पदाचा उघड सौदा आम्ही मांडीत नाहीं. आजारी पडलों असतां एका गिनीपेक्षां कमी फी घेणारा डॉक्टर धुंडाळण्याच्या उद्योगास आपण लागत नाहीं, कोर्टात जावयाचें असल्यास सहा शिलिंग आठ पेन्साऐवजीं चार

शिलिंग सहा पेन्स वकिलास देऊं करण्याचा विचार आमच्या डोक्यांत येत नाहीं किंवा पावसाच्या सरींत सांपडलों असतां मैली सहा पेन्सापेक्षां कमी भाड्यांत नेणारा गाडीवाला शोधून काढण्याच्या भरीस आपण पडत नाहीं.

अर्थात् हें खरें आहे कीं, या सर्व उदाहरणांत, आणि कल्पनेंत येणाऱ्या अशाच इतर उदाहरणात, ज्या कामाचा आपण विचार करीत असतों तें लोकांना कितपत कठिण भासतें व तें करण्यास किती लोक पुढें येण्याचा संभव असतो, या प्रश्नांचा शेवटीं आपणांस विचार करावाच लागतो. जर समाजाला असें वाटूं लागलें कीं, चांगला डॉक्टर बनण्यास लागणारे कष्ट करण्यास अर्धी गिनी फी मिळण्याच्या आशेनेंहि पुरेसे विद्यार्थी पुढें येऊं शकतील, तर आजच्या डॉक्टरांना अधिक मिळणारी अर्धी गिनी कमी करावी असें समाजास वाटूं लागेल. या अंतिम दृष्टीनें कामास मिळणारा मोबदला नेहमींच त्याला असणाऱ्या मागणीवर अवलंबून असणार, पण तात्कालिक व्यवहार करण्याच्या दृष्टीनें पाहिल्यास समाजांतील श्रेष्ठ प्रतीचें सर्व काम न बदलणाऱ्या ठराविक मोबदल्यानेंच होत असतें व आजपर्यंत होत आलें आहे. हेंच तत्त्व समाजांतील सर्व प्रकारच्या कामांस लागू करण्यांत आलें पाहिजे.

" काय ? " आश्चर्यानें थक्क होऊन वाचक उद्गारतील, " चांगलें काम करणाऱ्या आणि वाईट काम करणाऱ्या मजुरांना एकच पगार द्यावा ? "

" अलबत. " एका धर्माधिकाऱ्याचें प्रवचन आणि त्याच जागेवर नेमलेल्या दुसऱ्या धर्माधिकाऱ्याचें प्रवचन, अथवा एका डॉक्टराचा सल्ला आणि दुसऱ्या डॉक्टराचा सल्ला, यांच्यांतील अंतर त्या दोघांच्या बुद्धीच्या तारतम्याच्या दृष्टीनें पाहिलें किंवा लोकांवर पडणाऱ्या परिणामांच्या दृष्टीनें पाहिलें तरी विटा रचणाऱ्या चांगल्या व वाईट गवंड्याच्या कामांत पडणाऱ्या अंतरापेक्षां केव्हांही अधिक असतें. ( मात्र गवंड्यागवंड्यांच्या कामांतील अंतरहि पुष्कळ लोकांना वाटतें त्यांपेक्षां अधिक असतें ). तरीहि तुमच्या मनावर बरेवाईट संस्कार करणाऱ्या कामगाराला, अथवा तुमच्या शरीरावर बरेवाईट परिणाम घडविणाऱ्या कारागिराला तुम्ही सारखेंच वेतन संतोषानें देतां; तर मग तुमच्या घराची बरीवाईट रचना

करणाऱ्या कामगाराला सारखेंच वेतन तुम्ही अधिक संतोषानें देणें तुमचें कर्तव्य नाहीं काय ?

"छे, माझा डॉक्टर व माझा धर्माधिकारीहि मी पसंत करतों आणि अशा प्रकारें त्याच्या पात्रतेसंबंधींचा माझा अभिप्राय मी व्यक्त करीत असतों." तर मग तशाच प्रकारें तुम्ही आपला गवंडीहि अवश्य पसंत करा. चांगल्या कामगाराचें हेंच खरें बक्षीस असतें, कीं त्याला लोक पसंत करतात. सर्व प्रकारच्या कामासंबंधी ही एकच पद्धति नैसर्गिक व योग्य आहे की, त्याचें वेतन निश्चित ठरलेलें असावें व जो तें चांगल्या प्रकारें करील त्यालाच तें मिळावें: वाईट करणारास तें मिळूं नये. वाईट कामगारांस अर्ध्या वेतनावर तेंच काम करण्याची मुभा ठेवावी आणि अशा प्रकारें चांगल्या कामगारांशीं चढाओढ करून त्यांच्या वेतनाचे दर कमी करण्याचें अथवा त्यांची जागा आपण पटकावण्याचें स्वातंत्र्य वाईट काम करणारांस द्यावें ही पद्धति अनैसर्गिक, खोटी आणि हानिकारक आहे.

अशा प्रकारची वेतनांची समानता स्थापन करणें हें आपलें पहिलें उद्दिष्ट असून तें प्राप्त करून घेण्याचा अगदीं सरळ मार्ग आपणांस शोधून काढावयाचा आहे. या विषयांतील दुसरें उद्दिष्ट म्हणजे मागें म्हटल्या-प्रमाणें कारखान्यांतील कामगारांची संख्या, त्यांतील मालास तात्कालिक मागणी कितीहि असली तरी, कायम कशी ठेवावी, हें होय.

उद्योगप्रधान देशांतील व्यापारी व्यवहारांमुळें निरनिराळ्या मालांच्या मागणीचा एकदम मोठा संकोच किंवा विकास होतो. हीच एक या बाबतींतील महत्त्वाची अडचण असून तिच्यावर उपाय शोधून काढल्या-खेरीज कामकरी वर्गाची हितकर संघटना करतां येणार नाहीं.

या विषयाच्या विवेचनास इतके फाटे फुटण्याचा संभव आहे कीं, तें अशा प्रकारच्या लहानशा निबंधांत पुरें होणें शक्य नाहीं. या विषयाचा विचार करीत असतां पुढील सर्वसामान्य गोष्टींकडे लक्ष देणें आवश्यक आहे.

एकादें काम सतत चालण्याची शाश्वति असेल, तर तें काम करणाऱ्या कामकऱ्यांस जितकें जीवनवेतन द्यावें लागेल, त्याहून ज्या कामांत मधुनमधून खंड पडण्यासारखा असतो, त्यांस अधिक वेतन मिळणें अवश्य असतें. काम

मिळविण्यासंबंधीची चढाओढ कितीहि तीव्र झाली तरीहि जर कामगारांना आठवड्यांतून तीनच दिवस काम मिळण्याची शाश्वति वाटत असेल, तर आठवड्यातून सहा दिवस काम मिळण्याची निश्चिति असतांना जेवढें वेतन त्यांस द्यावें लागेल त्याहून अधिक वेतन त्यांना मिळालें पाहिजे. हा सिद्धांत नेहमींच खरा ठरेल. प्रत्येक मनुष्यास दररोज जीवनासाठीं एक शिलिंग लागतो अशी कल्पना केली, तर त्याला आठवड्यांतून कसेंहि करून सात शिलिंग मिळविले पाहिजेत. मग तीन दिवस जिवापाड मेहनत करून ते मिळोत किंवा नियमित काम करून सहा दिवसांत मिळोत. आजच्या व्यापारी जगांतील सर्व व्यवहारांची अशी एक प्रवृत्ति आहे कीं, तीमुळें व्यापाराला आणि मजुरीच्या दरांना सोडतीचें स्वरूप प्राप्त होत असतें, आणि म्हणून कामकऱ्यांना पगार मिळायचा तर कांहीं काळ कष्ट करून कांही काळ स्वस्थ बसावें लागतें आणि संधी साधण्याचें आपलें बुद्धिचातुर्य उपयोगांत आणण्यावर मालकाचा नफा अवलंबून असतो.

आधुनिक व्यापारी व्यवहारात ही गोष्ट किती अल्प प्रमाणांत अपरिहार्य आहे, त्याचें संशोधन मी येथें करूं इच्छीत नाहीं. येथें फक्त येवढेंच सांगून ठेवतों की, या गोष्टीचे जे अत्यंत भयंकर प्रकार आहेत ते तरी निदान खात्रीनें टाळतां येण्याजोगे आहेत; कारण केवळ मालकांची जुगारी वृत्ति आणि कामकऱ्यांचें अज्ञान व अधीर वृत्ति यांतूनच त्यांचा उगम होत असतो. भाग्योदयाच्या प्राकारांत थोडीहि फट दिसली तरी एकदम तींत घुसून संपत्तीचा कबजा घ्यावा, आणि नुकसान होण्याचा थोडाहि धोका दिसला तरी उतावीळपणानें त्याच्या भरपाईची तरतूद करून ठेवावी, अशी मालकांची वृत्ति असते. दुसऱ्या पक्षीं (कामगारांनाहि सहा दिवस नेमस्त काम करून एक दिवस शहाणपणानें विश्रांति घ्यावी, या पद्धतीपेक्षां तीन दिवस जिवापाड मेहनत करावी व तीन दिवस दारू पिऊन झिंगून पडावें हेंच बरें वाटतें) ज्या मालकांना आपल्या नोकरांचें हित करण्याची इच्छा असेल त्यांनीं आपल्या आंगच्या व आपल्या नोकरांच्या आंगच्या अव्यवस्थितपणाच्या या संवयी काढून टाकण्याचा प्रयत्न करावा. त्यांना साहाय्य करण्याचा याहून अधिक

श्रेयस्कर उपाय नाहीं. आपल्या कारखान्यांतील काम त्यांनी नेहमी एवढ्याच प्रमाणावर चालवावें कीं, तो त्यांस अव्याहतपणें चालवता येईल, त्यांनी अल्पकालीन नफ्याच्या मोहास बळी पडूं नये. आपण असें धोरण अवलंबीत असता आपल्या कामगारांसहि नियमित कामाच्या व जीवनाच्या संवयी त्यांनी लाविल्या पाहिजेत. कांहीं काळ अधिक मजुरी मिळून कामाची अशाश्वति राहण्यापेक्षां, थोडा कमी दर पडला तरी, ठराविक पगार सतत मिळण्याची शाश्वति असण्यांत आपलें हित आहे असें त्यास पटवून द्यावें. अथवा हें शक्य नसेल, तर वरकरणी अधिक वाटणारी पण जिवापाड मेहनत करून मिळणारी मजुरी बंद करून नियमित काम घेऊन थोडा कमी पगार देण्याची पद्धति सुरू करावी.

अशा प्रकारची मूलगामी सुधारणा करण्याच्या चळवळीच्या पहिल्या पुरस्कर्त्यांस बरेंच नुकसान व गैरसोय सोसावी लागेल हें खास; पण जी गोष्ट बिनकष्टानें व बिनतोट्यानें करतां येते तीच करण्याची सर्वांत अधिक आवश्यकता असते, किंवा ती करणें हेंच आपलें कर्तव्य असतें, असें म्हणतां येत नाही.

हिंसा करण्यासाठी संघटित होणारे सैनिक आणि धनोत्पादनासाठीं एकत्र जमणारे लोक, यांच्यांतील भेद मागें मीं उल्लेखिला आहेच. पहिले एकमेकासाठीं स्वार्थत्याग करण्यास तयार असतात व दुसरे तसे नसतात असें दिसून येतें. याच एका विलक्षण वस्तुस्थितीमुळें शस्त्रधारणाचा धंदा करणारापेक्षां व्यापारधंदा करणाऱ्या लोकांस समाजात कमी मान मिळत असतो. क्रयविक्रय करणाऱ्या शांतताप्रिय आणि बुद्धिप्रधान मनुष्यास मिळतो त्यापेक्षां हिंसेचा धंदा करणाऱ्या आडदांड व प्रायः अविवेकी अशा माणसांस अधिक मान मिळावा ही गोष्ट केवळ तात्त्विक दृष्ट्या विचार करितां सकृद्दर्शनीं समंजसपणाची वाटत नाही. कित्येक लेखकांनी तर हा असमंजसपणा असल्याचें सिद्ध करण्याचाहि प्रयत्न केला आहे. तरीहि या तत्त्वज्ञांच्या मताला मान न देतां मनुष्यांनीं क्षत्रियाला सामान्यतः अधिक श्रेष्ठ स्थान नेहमीच दिलेलें आहे आणि तें योग्यच आहे.

कारण, वास्तविक रीत्या सैनिकाच्या धंद्याचें रहस्य मारण्यांत नसून मरण्याला तयार असण्यांत आहे, आणि जगाला याची स्पष्ट जाणीव

नसली तरी तें याचसाठीं सैनिकांचा गौरव करीत असतें. मारेकऱ्याचा धंदा मारण्याचा असतो, पण जगानें वेश्यापेक्षां मारेकऱ्याला अधिक मान दिलेला नाहीं. तें सैनिकाचा सन्मान करतें याचें कारण तो आपलें जीवित राष्ट्रसेवेसाठीं धारण करीत असतो. तो बेफिकीर असेल, सुखाचा व साहसाचा त्याला छंद असेल, आपला धंदा स्वीकारतांना अनेक गौण हेतू व हीन वृत्ती त्याच्या अंतःकरणांत असतील व त्या सर्व त्याच्या विशिष्ट वर्तनांत नित्य व्यक्तहि होत असतील, तरीहि आम्ही त्याला जर एखाद्या किल्ल्याच्या तटाला पडलेल्या खिंडारांत उभे केलें आणि त्याच्या पाठीशी जगांतील सर्व सुखांचा ठेवा आणि समोर केवळ कर्तव्य आणि मृत्यु, अशी परिस्थिति निर्माण झाली, तर तो पाठमोरा वळणार नाहीं. अशा प्रकारची निवड करण्याचा प्रसंग कोणत्याहि क्षणीं येईल याची त्याला जाणीव असते, किंबहुना अशी निवड त्यानें केलेलीच असते, सतत तो ती करीत असतो आणि वस्तुतः दररोज मरणाचा अनुभव घेत असतो.

आपण वकिलांना आणि डॉक्टरांना जो मान देतों, त्याचेंहि मूळ अंतिम दृष्ट्या त्यांच्या स्वार्थत्यागांतच आढळेल. एखाद्या वकिलाची विद्वत्ता किंवा त्याच्या बुद्धीची कुशाग्रता कितीहि असली तरी त्याला जर न्यायासनावर बसविलें तर कोणत्याहि परिणामाकडे लक्ष न देतां तो निःपक्षपाती न्याय देण्याचा प्रयत्न करील, असा आपला विश्वासच आपण त्याला जो मान देतो त्याच्या मुळाशीं असतो. आपणांस जर असें वाटत असेल कीं, तो लांच घेऊन आपल्या कुशाग्र बुद्धीचा व कायद्याच्या ज्ञानाचा दुरुपयोग करील व अन्यायाला न्यायाचें स्वरूप देईल, तर त्याची बुद्धिमत्ता कितीहि मोठी असली, तरी तिच्यामुळें त्याच्याविषयीं आमच्या अंतःकरणांत पूज्यभाव निर्माण होणार नाहीं. आपल्या जीवनांतील प्रत्येक महत्त्वाच्या कृतींत तो न्यायाला प्राधान्य देईल व स्वहिताला गौण लेखील, अशी आपली मनोमय खात्री नसेल तर इतर कोणत्याहि कारणानें आपण त्यास मान देणार नाहीं.

डॉक्टराचा दाखला घेतल्यास आपण त्यास देत असलेल्या मानाचें मूळ अधिकच विशद होतें. तो जर आपल्या रोग्याकडे केवळ प्रयोगांचे

विषय याच दृष्टीनें पाहत असल्याचें आढळेल, तर त्याचें शास्त्रज्ञान कितीहि अगाध असलें तरी तिरस्कारानें त्याच्यापासून आपण दूरच राहूं. त्यांतून आपल्या रोग्याचें मरण इच्छिणाऱ्या लोकांकडून लांच खाऊन औषधाच्या मिषानें विषप्रयोग करण्यांत तो आपलें कौशल्य उपयोगांत आणतो असें आपणांस आढळलें, तर त्याच्या संबंधींचा आपला तिरस्कार अधिकच वाढेल.

शेवटीं हेंच तत्त्व धर्माधिकारी वर्गाच्या उदाहरणांत अत्यंत विशद रूपानें व्यक्त होतें. डॉक्टर किंवा वकील यांच्यापाशीं कितीहि सद्बुद्धि असली तरी पहिल्यापाशीं शास्त्रज्ञान नसेल अथवा दुसऱ्याजवळ चाणाक्ष-पणा नसेल, तर आपण त्यांची गय करणार नाहीं. पण एकाद्या धर्मा-धिकाऱ्याचें बुद्धिबल कमी असलें, तरीहि त्याची निःस्वार्थी सेवावृत्ति गृहीत धरूनच आपण त्यास मान देत असतों.

एकादी मोठी व्यापारीमंडळी यशस्वी रीतीनें चालविण्यास तिच्या व्यवस्थापकाच्या अंगीं समयज्ञता, दूरदृष्टि, निर्णयशक्ति, इत्यादी जे बौद्धिक गुण लागतात, त्यांची तुलना एकाद्या मोठ्या वकिलास, सेना-पतीस किंवा धर्माधिकाऱ्यास लागणाऱ्या गुणांबरोबर करतां येत नाहीं, असें मानिलें तरी जहाजावरील, सैन्यांतील किंवा धर्माधिकारी वर्गांतील दुय्यम प्रतीच्या लोकांत वसत असणाऱ्या गुणांबरोबर त्यांची तुलना खास करितां येईल. आज एकाद्या व्यापारीमंडळीच्या व्यवस्थापकापेक्षां विद्वत्ताप्रधान धंद्यांतील कार्यक्षम लोकांस समाजांत अधिक मान मिळत असेल, तर त्याचें मूळ त्यांच्या आंगच्या बौद्धिक गुणांतील भेदांत आढळणार नाहीं. त्याहून अधिक खोल ठिकाणीं तें असल्याचें आढळेल.

व्यापारी हा नेहमीं स्वार्थबुद्धीनेंच वर्तन करीत असतो, हें गृहीत-कृत्यच या भेदभावाचें खरें कारण आहे, असें दिसून येईल. व्यापाऱ्याचें कार्य अत्यंत आवश्यक असलें, तरी तें करण्यांत त्याची बुद्धि केवळ व्यक्तिनिष्ठ असते, असें गृहीत धरण्यांत येत असतें. लोकांचा असा समज आहे कीं, व्यापाऱ्याचा सर्व व्यवहारांतील आद्य हेतु आपणास जास्तींत जास्त लाभ व्हावा आणि शेजाऱ्याच्या अथवा गिऱ्हाइकाच्या पदरांत तो शक्य तितका कमी पडावा हाच असतो. राज्यसंस्थेनें केलेल्या कायद्यांनींहि

त्याच्या वर्तनाचें हेंच तत्त्व असावें, असें ठरविलें आहे. ग्राहकानें आपल्या पदरांत शक्य तितका स्वस्त माल पडेल असा प्रयत्न करावा आणि विक्रेत्यानें त्याची वंचना करण्यास झटावें, असाच जगाचा न्याय आहे असें समाज आक्रोशून सांगत असतो. सदासर्वदा याच तत्त्वाची शिफारस त्या वर्गाला समाजाकडून केली जाते. आणि या वर्गाशीं समाजाचें वर्तनहि तसेंच असतें. अशाप्रकारें एका पक्षीं समाज या तत्त्वास आपली मान्यता दर्शवीत असतो; पण दुसऱ्या पक्षीं या तत्त्वाप्रमाणें प्रत्यक्ष वर्तन करणाऱ्या व्यापारी वर्गावर कायमची हीन वर्णाची मुद्रा ठोकून अभावितपणें त्याचा निषेध करीत असतो.

अखेरीस ही वृत्ति सोडणें भाग आहे असें समाजाला दिसून येईल. स्वार्थबुद्धीचा निषेध करणें समाजानें सोडतां कामा नये, पण जिला केवळ स्वार्थसाधनाचें स्वरूप नाहीं अशी व्यापारपद्धति शोधून काढणें समाजास भाग आहे. किंबहुना अशा व्यापारपद्धतीव्यतिरिक्त दुसरी कोणतीहि व्यापाराची खरी पद्धति असूंच शकत नाहीं किंवा पूर्वी झालेली नाहीं, हा शोध त्यास लावावा लागेल. आज आपण ज्याला व्यापार म्हणतो तो व्यापार नसून ती एक वंचनकला आहे. वर्डस्वर्थच्या एक्सकर्शन या काव्यांतील नायक आणि ग्रीक पुराणांतील ऑटोलिकस यांच्यांत जितकें अंतर आहे, तितकेंच अंतर खरा व्यापारी आणि आधुनिक अर्थशास्त्राच्या सिद्धांतांत अभिप्रेत असलेला व्यापारी यांच्यांत असल्याचें आढळून येईल. समाजास आढळून येईल कीं, प्रवचनें करण्याच्या किंवा एकमेकांना मारण्याच्या धंद्यांपेक्षां प्रतिष्ठित लोकांनीं व्यापारांत पडण्याची अधिक आवश्यकता आहे, आणि खऱ्या प्रवचनकाराच्या धंद्यांत किंवा खऱ्या युद्धाच्या धंद्यांत ज्याप्रमाणें स्वेच्छेनें स्वार्थत्याग करण्याची आवश्यकता अंतर्भूत होते, त्याचप्रमाणें व्यापारांतहि मधुनमधून स्वार्थत्यागाचे प्रसंग निर्माण होत असतात. ज्याप्रमाणें कर्तव्यबुद्धीनें प्राण गमावावे लागतात, त्याचप्रमाणें कर्तव्यासाठीं छदामहि गमावावे लागतात. व्यासपीठावर प्रवचनें करणारांतून हुतात्मे निर्माण होतात, त्याचप्रमाणें बाजारपेठेंतहि हुतात्मे निर्माण होऊं शकतील, आणि जसें युद्धांत शौर्य गाजवितां येतें, तसेंच तें व्यापारांतहि गाजवितां येईल.

शौर्य गाजवितां येईल, इतकेंच नव्हे, तर अंतिम दृष्ट्या तें गाजवितां आलेंच पाहिजे. आजपर्यंत असें घडलें नाहीं, याचें कारण शूर वृत्तीच्या तरुणांची दिशाभूल होऊन ते इतर क्षेत्रांत ओढले जातात. आजच्या काळांत हेंच क्षेत्र कदाचित् अत्यंत महत्त्वाचें असेल याची त्यांना जाणीव नसते. याचा परिणाम असा होतो कीं, धर्मग्रंथांतील एकादा अध्याय शिकविण्यासाठीं एकादा उत्साही मनुष्य आपलें जीवित वेंचण्यासहि तयार होतो, पण तींच तत्त्वें अमलांत आणण्यासाठीं शे सव्वाशे पौंड गमावण्याचा प्रसंग आल्यास फारच थोडे लोक पुढें येतात.

वस्तुस्थिति अशी आहे कीं, व्यापाऱ्यांचें इतर समाजासंबंधीं खरें कर्तव्य काय आहे तें कोणी लोकांना स्पष्टपणें कधींहि समजूनच दिलेलें नाहीं. वाचकांचे या बाबतींतील विचार अगदी निःसंदिग्ध व्हावेत एवढीच माझी इच्छा आहे.

जीवनाच्या नित्य गरजा भागविणारे पांच मोठे बुद्धिप्रधान व्यवसाय आजपर्यंत अस्तित्वांत आले आहेत. प्रत्येक सुधारलेल्या राष्ट्रात त्यांपैकीं तीन तरी अवश्य असतातच.

समाजाचें रक्षण करणें, हा सैनिकाचा धंदा आहे.

त्याला शिक्षण देणें, हा धर्माधिकाऱ्याचा धंदा आहे.

त्याला निरोगी ठेवणें, हा वैद्याचा धंदा आहे.

त्याच्यांत न्यायप्रस्थापना करणें, हा वकिलाचा धंदा आहे.

त्याला माल पुरविणें, हा व्यापाऱ्याचा धंदा आहे.

आणि हें कार्य करीत असतां योग्य प्रसंगीं मरण स्वीकारणें, हें या सर्वांचें कर्तव्य आहे.

" योग्य प्रसंगीं " म्हणजे :

रणांगणांतील आपली जागा न सोडतां सैनिकानें,

प्लेगसारखे सांथीचे रोग उद्भवले असतां आपलें गांव न सोडतां वैद्यानें,

खोट्या धर्माचा उपदेश करण्याचा प्रसंग गुदरला असतां धर्माधिकाऱ्यानें,

अन्याय घडलेला पाहण्याचा प्रसंग आला असतां वकिलानें, मरण्यास तयार असलें पाहिजे.

अशा प्रकारच्या मृत्यूला कवटाळण्याचा व्यापाऱ्यास योग्य प्रसंग कोणचा ?

आपल्या सर्वांप्रमाणें व्यापाऱ्याच्या दृष्टीनेंहि हाच महत्त्वाचा प्रश्न आहे. कारण ज्या मनुष्याला आपण कोणत्या प्रसंगीं मरण पत्करावें हें समजत नाहीं, त्याला खरोखर कसें जगावें, हेंच समजत नाहीं.

व्यापाऱ्याचें कर्तव्य ( आणि या ठिकाणीं व्यापारी या शब्दांत कारखानदारांचाहि समावेश व्यापक अर्थानें केला पाहिजे ) राष्ट्राला माल पुरवणें हें आहे. ज्याप्रमाणें आपला पगार मिळविणें हें धर्माधिकाऱ्याचें कर्तव्य होऊं शकत नाहीं, त्याचप्रमाणें लोकांना माल पुरवीत असतां होणारा नफा मिळविणें, हें व्यापाऱ्याचें कर्तव्य होऊं शकत नाहीं. त्याला मिळणारें हें बक्षीस योग्य आणि अवश्य असें त्याच्या सेवेचें फल आहे. पण तें त्याच्या जीवनाचें उद्दिष्ट नव्हे. ज्याप्रमाणें खऱ्या धर्माधिकाऱ्याचें पगार हें उद्दिष्ट होऊं शकत नाही, किंवा त्याला मिळणारी फी हें खऱ्या वैद्याचें उद्दिष्ट असूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें व्यापाऱ्याला मिळणारा मोबदला, हें त्याचें उद्दिष्ट होऊं शकत नाहीं. जर त्यांच्यापाशीं खरें मनुष्यत्व असेल तर ही फी मिळविण्याव्यतिरिक्त त्यांनीं करावयाचें असें समाजाचें विशिष्ट कार्य असलेंच पाहिजे, आणि तें त्या तिघांनींहि कांहीं झालें तरी–फीऐवजी नुकसान होणार असलें तरीहि–केलेंच पाहिजे. शिक्षण देणें हें धर्माधिकाऱ्याचें कार्य आहे, रोग बरे करणें हें वैद्याचें कार्य आहे आणि वर म्हटल्याप्रमाणें माल पुरविणें हें व्यापाऱ्याचें कर्तव्य आहे. म्हणजे तो ज्या मालाचा व्यापार करीत असेल त्याचे गुणदोष त्याला पूर्णपणें माहित असले पाहिजेत आणि तो कसा संपादन करावा वा तो कसा बनवावा हें त्याला समजलें पाहिजे. तसेंच तो माल शुद्ध स्वरूपाचा निर्माण करण्याच्या वा संपादन करण्याच्या कामीं त्यानें आपली सर्व शक्ति व चातुर्य वेचिलें पाहिजे. तसेंच ज्यांना त्याची अत्यंत आवश्यकता असेल त्यांना तो शक्य तितक्या स्वस्त दरानें मिळेल अशी त्यानें खटपट केली पाहिजे.

कोणतीहि वस्तु निर्माण व संपादन करण्याच्या कार्यास पुष्कळांचे हात लागावे लागतात व त्यांत पुष्कळांच्या जीविताशीं संबंध येत असतो.

यामुळें आपला व्यवसाय करीत असतां व्यापारी अनेक लोकांचा मालक व शास्ता बनत असतो. एकाद्या लष्करी अधिकाऱ्यापेक्षां किंवा धर्माधिकाऱ्यापेक्षां इतरांच्या जीविताशीं येणारा त्याचा हा संबंध कोणाच्या लक्षांत येत नसला तरी अधिक जिव्हाळ्याचा असतो, आणि त्यांचें जीवन कशा प्रकारें चालावयाचें हें बहुताशी त्याच्या वर्तनावर अवलंबून असतें. म्हणून आपला माल अगदी शुद्ध स्वरूपात आणि स्वस्त भावात कसा निर्माण करावा याची सतत चिंता वाहणें एवढेंच त्याचें कर्तव्य नसून तो निर्माण करण्यांत अथवा त्याची वाहतुक करण्यांत ज्या ज्या लोकांशीं त्याचा संबंध येईल, त्या सर्वांचें त्या त्या व्यवसायापासून जास्तींत जास्त हित कसें साध्य होईल, याची काळजी वाहणें हेंहि त्याचें कर्तव्य ठरतें.

हीं दोन कर्तव्यें पार पाडण्यास व्यापाऱ्याच्या अंगी श्रेष्ठ प्रकारची बुद्धिमत्ता, धीरवृत्ति, औदार्य आणि समयज्ञता हे बौद्धिक गुण लागतात. त्याचप्रमाणें हीं कार्यें न्यायीपणानें घडावींत म्हणून प्रसंग येईल तेव्हां एकाद्या सैनिकाप्रमाणें अथवा वैद्याप्रमाणें अवश्य तर आपले प्राणहि अर्पण करावेत हें त्याचें कर्तव्य असतें. माल पुरविण्याचा आपला व्यवसाय करीत असतां त्यानें दोन गोष्टींकडे विशेष लक्ष पुरविलें पाहिजे. दिलेलें वचन त्यानें पाळलें पाहिजे. ( आपली वचनें निष्ठापूर्वक पाळलीं नाहींत तर कोणताहि व्यापार शक्य होणार नाही. ) आणि दुसरी गोष्ट म्हणजे त्यानें पुरविलेला माल निर्दोष आणि निर्भेळ असला पाहिजे. म्हणजे आपण केलेला करार मोडण्यापेक्षां किंवा आपण दिलेल्या मालात भेसळ करण्यापेक्षां किंवा हिणकस माल पुरविण्यापेक्षां, अथवा अन्यायानें फाजील किंमत आकारण्यापेक्षां क्लेश, दारिद्र्य अथवा कष्ट भोगूनहि या दोन तत्त्वांचें पालन त्यानें धिटाईनें केलें पाहिजे.

याशिवाय आपल्या हाताखालच्या लोकांचा शास्ता या नात्यानें व्यापाऱ्याला किंवा कारखानदाराला पितृतुल्य अधिकार व जबाबदाऱ्या प्राप्त होत असतात. एकाद्या व्यापारी कंपनींत तरुण मनुष्यानें नोकरी धरली म्हणजे तो बहुधा घरच्या वातावरणापासून दुरावतो. अशा वेळीं त्याला सतत व्यावहारिक सहाय्य करण्याची जबाबदारी पार पाडण्याचें कर्तव्य पितृबुद्धीनें त्या व्या मालकानें पार पाडिलें पाहिजे. तरुण मनुष्याच्या मनावर घरच्या

वळणापेक्षां, ज्या मालकाच्या हाताखालीं तो काम करीत असेल, त्याचा अधिकार, तेथील शिस्त व सर्वसामान्य वातावरण, आणि ज्या लोकांशीं त्या धंद्याच्या निमित्तानें त्याचा सहवास होत असेल, त्यांचें शील या सर्वांचा अधिक जोरदार ठसा नेहमींच उमटत असतो. म्हणून आपल्या हाताखालच्या लोकांशीं होणारें आपलें वर्तन न्यायाचें आहे किंवा नाहीं, हें ठरवितांना प्रत्येक मालकानें स्वतःस निष्ठुरपणें पुढील प्रश्न विचारावाः जर परिस्थितीच्या ओघांत आपल्या स्वतःच्या मुलाला आपल्या हाताखालच्या नोकराचें काम द्यावें लागलें, तर त्याच्याशी आपण जसें वागूं तसेंच इतरांशीं आपण वागतों काय ?

जर एकाद्या आरमारांतील जहाजावरील कप्तानास स्वतःच्या मुलास खलाशाचें काम देणें योग्य वाटलें, अथवा प्रसंगवशात् देणें भाग पडलें, तर तो त्याला जसें वागवील त्याचप्रमाणें इतरांसहि वागविणें हें त्याचें कर्तव्य आहे. त्याचप्रमाणें जर एकाद्या कारखानदाराला आपल्या मुलास सामान्य कामकऱ्याचें काम देणें योग्य वाटलें अथवा प्रसंगवशात् देणें भाग पडलें अशी कल्पना केली, तर त्या परिस्थितींत तो आपल्या मुलाशीं जसा वागेल तसेंच त्यानें आपल्या सर्व नोकरांशीं वागलें पाहिजे. या प्रश्नासंबंधीं हा एकच खरा, व्यवहार्य व फलप्रद नियम अर्थशास्त्राला सांगतां येण्यासारखा आहे.

आपलें जहाज फुटलें असतां त्यांतून सर्व लोक उतरून गेल्यानंतरच तें सोडून जाणें अथवा जहाजावरील अन्नाचा पुरवठा संपला असतां आपल्या जवळचें सर्व अन्न सर्वांना वाटून देणें हें त्याच्यावरील कप्तानाचें कर्तव्य असतें. त्याचप्रमाणें कोणतेंहि व्यापारी अरिष्ट अथवा संकट कोसळलें असतां त्यामुळें आपल्या नोकरांस भोगाव्या लागणाऱ्या क्लेशांत कारखानदारानें समविभागी होणें त्याचें कर्तव्य आहे. तसेंच आपल्या नोकरांस भोगाव्या लागणाऱ्या कष्टांचा भार तितक्याच किंबहुना, अधिक प्रमाणांत स्वतः सहन करणें, हें त्याचें कर्तव्य आहे. दुष्काळ, नौकाभंग अथवा युद्ध यासारख्या आपत्तींत बाप स्वतःच्या मुलासाठीं अशाच प्रकारचा स्वार्थत्याग करीत असतो.

हें सर्वच मोठें विलक्षण भासेल. पण तें तसें भासावें यांतच केवळ

त्यांतील वैलक्षण्य आहे. कारण हें सर्व सत्य आहे आणि तें केवळ अंशतः नव्हे किंवा केवळ तत्त्वतः नव्हे, तर पूर्णतः आणि व्यवहारतःहि सत्य आहे. सामाजिक प्रश्नासंबंधींचीं इतर सर्व मतें खोट्या गृहीतकृत्यांवर आधारलेलीं, हास्यास्पद निष्कर्षांनीं भरलेलीं आणि राष्ट्रीय जीवनाच्या प्रगतीच्या दृष्टीनें व्यवहारांत आणण्यास अशक्य अशीं आहेत. आज आपल्या समाजांतील कांहीं थोडे दृढनिश्चयी व निष्ठावंत लोक समाजाला शिकविण्यांत येणाऱ्या अर्थशास्त्रीय तत्त्वांना बुद्धिपुरःसर तुच्छ लेखून आपलें वर्तन असें ठेवीत आहेत यामुळेंच त्यांत कांहीं जिवंतपणा दिसत आहे. आणि जेवढ्या प्रमाणांत या तत्त्वांना राष्ट्राकडून मान्यता मिळाली आहे तेवढ्या प्रमाणांत त्याचा सरळ घात होत आहे. या तत्त्वांमुळें हा घात कोणत्या प्रकारें व कोणत्या स्वरूपांत होत आहे आणि खऱ्या तत्त्वांची व्यवहारांत अधिक प्रमाणांत कशी बजावणी करावी, याचा विचार मी पुढील निबंधांत करणार आहें.



# निबंध २ रा



# संपत्तीचे प्रवाह

मागील निबंधांत जीं विधानें करण्यांत आलीं आहेत, त्यांना सर्वसामान्य अर्थशास्त्रज्ञ पुढीलप्रमाणें उत्तर देतील :

" सामाजिक भावना वृद्धिंगत झाल्यास सर्वसामान्य स्वरूपाचे कांहीं फायदे समाजाला होतील हें खरें आहे. पण असे सर्वसामान्य स्वरूपाचे फायदे आम्ही लक्षांत घेऊं असा दावा अर्थशास्त्रज्ञांनीं आजपर्यंत कधीं केला नाहीं व आजहि ते तसा करीत नाहींत. आमचें शास्त्र हें केवळ श्रीमंत बनण्याचें शास्त्र आहे. तें भ्रामक किंवा काल्पनिक नसून अनुभवानें प्रत्यक्ष व्यवहारांत परिणामकारक ठरलेलें आहे. जे त्याच्या सिद्धांतानुसार वर्तन करतात ते प्रत्यक्ष श्रीमंत बनतात व जे त्याचें उल्लंघन करतात ते दरिद्री बनतात. आमच्या शास्त्राचे सुप्रसिद्ध सिद्धांत अवलंबूनच

युरोपांतील प्रत्येक भांडवलदारानें आपली संपत्ति कमावलेली आहे व त्याच नियमांना चिकटून राहून तो आपलें भांडवल दररोज वाढवीत असतो. प्रत्यक्ष करून दाखविलेल्या कार्याच्या या प्रभावापुढें तार्किक युक्तिवादाच्या हिकमती लढविण्याचा कांहींहि उपयोग होणार नाहीं. पैसा कसा कमावतां येतो व तो कसा गमावतो, याचें ज्ञान प्रत्येक व्यापाऱ्याला अनुभवानें होतच असतें."

माफ करा. आपण पैसा कसा कमावला अथवा वेळीं तो कसा गमावला हें व्यापारी लोकांस क्वचित माहीत असतें. अनेक वर्षे हा डाव खेळण्याचा सराव असल्यामुळें आपले पत्ते कसे टाकावेत हें त्याना माहीत असतें व आपणास होणारा नफातोटा कसा झाला हें ते योग्य प्रकारें समजावून सांगूं शकतात. पण या जुगारी अड्ड्याचा पेढीवाला कोण आहे आणि दिव्यांच्या लखलखाटातील आपल्या दिवाणखान्याच्या बाहेर दूर अशा अंधाऱ्या रस्त्यांवर राहाणाऱ्या लोकांचें याच पत्त्याच्या डावामुळें कसें नफानुकसान होत असतें, व तें नफानुकसान आपल्या या जुगाराशीं अप्रत्यक्ष रूपानें कसें संबद्ध आहे, यापैकीं एकाहि गोष्टीचें त्याना ज्ञान नसतें. व्यापारशास्त्रांतील अगदी थोडेसेच नियम त्यांनीं अवगत करून घेतलेले आहेत, पण सामाजिक अर्थशास्त्रापैकीं एकाहि नियमाचें ज्ञान त्यांना आलेलें नाही.

प्रथम अगदीं लक्षांत ठेवण्याजोगी व विलक्षण अशी एक गोष्ट निदर्शनास येते. ती ही कीं, या व्यापारी लोकांत "श्रीमंत" या शब्दाचा खरा अर्थ समजणारे लोक अगदीं क्वचितच आढळतात. निदान तो अर्थ त्यास माहीत असला तरी त्या शब्दानें व्यक्त होणारी कल्पना सापेक्ष आहे, म्हणजे ज्याप्रमाणें "उत्तर" हा शब्द उच्चारल्याबरोबर तद्विरोधी दक्षिण दिशेच्या अस्तित्वाचा बोध होत असतो, त्याप्रमाणें "श्रीमंत" म्हटल्याबरोबर तद्विरोधी "गरीब" लोकाच्या अस्तित्वाचाहि बोध होतो, या गोष्टीस ते आपल्या विचारांत कधीहि स्थळ देत नाहींत. लोक श्रीमंती ही एक निरपेक्ष अवस्था आहे असें समजूनच प्रायः बोलत व लिहीत असतात, आणि अर्थशास्त्रांतील विशिष्ट नियमांचें अवलंबन केल्यास

प्रत्येकास श्रीमंत होतां येईल असें ध्वनित करतात. पण श्रीमंती ही एक विद्युत्‌शक्तीप्रमाणें अशी शक्ति आहे कीं, ती विषमतेच्या व आत्मविरोधी शक्तींच्या साहचर्यानेंच आपला प्रभाव दाखवूं शकते. तुमच्या खिशांत असलेल्या गिनीचा प्रभाव तुमच्या शेजाऱ्याच्या खिशांत तशा गिनीचा अभाव असेल तरच चालू शकेल. जर त्याला तिची गरज नसेल तर तिचा तुम्हांस कांहींहि उपयोग होणार नाही. त्याला तिची जितक्या प्रमाणांत आवश्यकता असेल, बरोबर तितक्याच प्रमाणांत तिच्या अंगचें सामर्थ्य तुमच्या प्रत्ययास येईल. म्हणजे, सामान्य व्यापारी अर्थशास्त्राच्या दृष्टीनें आपणास श्रीमंत बनविण्याची कला म्हणजे आपल्या शेजाऱ्यास तितक्याच प्रमाणांत निश्चयानें गरीब बनविण्याची कला होय असा अर्थ होतो.

या विषयांतील विशिष्ट शब्दयोजनेबद्दल मी भांडत बसणार नाहीं, (व सामान्यतः कोणत्याहि विषयांत मी तसें करूं इच्छित नाहीं ) पण "सामाजिक अर्थशास्त्र" ( Political Economy ) आणि "व्यापारी अर्थशास्त्र" ( Mercantile Economy ) अशी दोन नावें ज्या दोन अर्थ-शास्त्रांना देतां येतील, त्यांच्यांतील भेद खोल दृष्टीनें व स्पष्टपणें वाचकांनीं समजून घ्यावा, अशी माझी इच्छा आहे.

सामाजिक अर्थशास्त्र ( राष्ट्राचें किंवा राष्ट्रिकांचें अर्थशास्त्र ) म्हणजे सुखकर व उपयुक्त वस्तू योग्य वेळीं व योग्य स्थळी कशा निर्माण कराव्या, त्या कशा सुरक्षित ठेवाव्या, आणि त्यांची विभागणी कशी करावी या संबंधींचें शास्त्र होय. आपल्या गवताची योग्य वेळीं कांपणी करणारा शेतकरी, भक्कम फळ्यांत मजबूत खिळे ठोकून जहाजें बांधणारा सुतार, उत्तम मळलेल्या चुन्यांत चांगल्या विटा बसविणारा गवंडी, आपल्या घरांतील सामानाचें काळजीपूर्वक रक्षण करून स्वयंपाकघरांत नासधूस होऊं न देणारी गृहिणी आणि आपला गळा योग्य प्रकारें कमावून त्याला कधींहि फाजील ताण न देणारी गायिका, हे सर्व खऱ्या व अंतिम दृष्टीनें सामाजिक अर्थशास्त्रवेत्ते ठरतात. कारण ते ज्या राष्ट्रात रहात असतील त्याच्या संपत्तींत व हितांत ते सतत भर टाकीत असतात.

याच्या उलट, व्यापारी अर्थशास्त्र हें एक पैशाचें अथवा द्रव्य संपादण्याचें शास्त्र आहे. यामुळें इतरांचे श्रम विकत घेण्याची सत्ता किंवा

कायदेशीर व नैतिक हक्क कांहीं व्यक्तीच्या हातीं यावा असा या शास्त्रापासून बोध होतो. असा कोणताहि हक्क म्हटला म्हणजे एका पक्षास संपत्ति व सत्ता आणि दुसऱ्या पक्षास तितक्याच प्रमाणांत दैन्य व ऋण असल्याचा बोध होत असतो.

म्हणून अशा श्रीमंतीमुळें ज्या राष्ट्रात ती असेल, त्या राष्ट्राची प्रत्यक्ष संपत्ति किंवा तेथील लोकांचें हित अधिक वाढलें असेल, असें निश्चितपणें म्हणतां येत नाही. पण अशा प्रकारची व्यापारी संपत्ति, अथवा इतरांच्या श्रमांवरील सत्ता, हिचें रूपातर खऱ्या संपत्तीत प्रायः नेहमीच करतां येतें. पण खऱ्या संपत्तीचें रूपांतर दुसऱ्याच्या श्रमांवरील सत्तेत नेहमींच करतां येतें असें नाहीं. यामुळें सुधारलेल्या राष्ट्रांतील धंदेवाल्या लोकांत 'श्रीमंती' या शब्दाचा अर्थ सामान्यत: 'व्यापारी संपत्ति' असाच केला जातो. तसेंच आपल्या मालमत्तेचा हिशेब करतांना आपलीं शेतें किंवा घोडे यांच्या किती गिनी येतील, त्याचा ते विचार करतात; पण याच्या उलट आपणाजवळ असणाऱ्या गिनींना किती घोडे किवा किती शेतजमीन विकत मिळेल असा हिशेब ते करीत नाहींत.

ही मनोवृत्ति रूढ होण्याचें आणखीहि एक कारण आहे. तें म्हणजे एकाद्यापाशीं खऱ्या मालमत्तेचा पुष्कळ संचय झालेला असला, तरी त्याचबरोबर दुसऱ्याचे श्रम विकत घेण्याची व्यापारी सत्ता त्याच्या हातीं नसेल तर त्याला आपल्या मालमत्तेचा फारसा उपयोग करतां येत नाहीं. अशी कल्पना करा कीं, एका मनुष्याजवळ पुष्कळ मोठी सुपीक जमीन आहे, त्याचें माळरान सोन्याच्या कणांनी संपन्न आहे, त्याच्या कुरणांत अनेक जनावरें चरत आहेत, त्याचीं घरें, बागा आणि कोठ्या अनेक उपयुक्त वस्तूंनी भरल्या आहेत. पण समजा, इतकें असूनहि त्याला एकहि नोकर मिळत नाहीं, तर काय होईल ? त्याला नोकर मिळावयाचे तर आजुबाजूस कोणीतरी निर्धन पाहिजेत व त्यांना त्याच्या सोन्याची किंवा धान्याची गरज भासली पाहिजे. असें गृहीत धरा कीं, या दोहोंपैकीं कशाचीहि इतर लोकांस वाण नाहीं आणि म्हणून त्याला एकहि नोकर मिळत नाहीं. अर्थात् त्याला स्वतःची भाकर स्वतः भाजावी लागेल, आपले कपडे स्वतः शिवावे लागतील, आपली जमीन स्वतः नांगरावी लागेल आणि आपलीं

जनावरें स्वतः राखावीं लागतील. आपल्या जमिनींतील कोणत्याहि पिवळ्या दगडाइतकाच त्याला आपल्या सोन्याचा उपयोग होऊं शकेल. त्याच्या कोठीत सांठविलेलें धान्य कुजूनच जाईल, कारण त्याला तें सर्व खाताहि येणार नाहीं. दुसऱ्या कोणत्याहि माणसापेक्षां अधिक धान्य त्यास खाता येणार नाहीं आणि अधिक कपडे पेहेरता येणार नाहींत. सामान्य सुखसोयी करून घेण्यासाठींहि शरीरश्रमाचें कष्टाळू जिणें त्यास पत्करावें लागेल. अखेरीस त्याला आपल्या घराची डागडुजीहि करता येणार नाही किंवा शेतांची नागरट करतां येणार नाही. साराश, एकाद्या गरीब मनुष्याप्रमाणें लहानशीच झोपडी आणि तिचें परसू एवढ्यावरच त्याला संतुष्ट रहावें लागेल. मात्र सभोंवार सर्वत्र माळरान पसरलेलें असून त्यावर रानटी जनावरें संचार करीत आहेत आणि मधुनमधून उध्वस्त झालेल्या जुन्या वाड्यांचे अवशेष आहेत, असें दृश्य त्याला दिसेल. ‘ही सर्व माझी संपत्ति’ असें स्वतःविषयीं उपहासानेंहि तो सहसा म्हणणार नाहीं.

मनुष्य कितीहि लोभी असला तरी अशा प्रकारची संपत्ति या शर्तीवर स्वीकारण्यांत त्याला फारसा आनंद होणार नाहीं असें मला वाटतें. श्रीमंती या नांवानें ज्या गोष्टीचा अभिलाष धरिला जातो ती म्हणजे इतर लोकांवर गाजविण्याची सत्ता ही होय. नोकर, व्यापारी आणि कलावंत यांचे श्रम आपल्या सुखासाठीं विकत घेण्याची सत्ता असावी हें या श्रीमंतीचें अगदीं साधें स्वरूप होय. राष्ट्रांतील मोठ्या जनसमुदायाकडून हितकारक, क्षुद्र अथवा हानिकारक असे वाटतील ते धंदे आपल्या इच्छेप्रमाणें करवून घेण्याची सत्ता सधन लोकास असावी, हा या श्रीमंतीचा अधिक व्यापक असा अर्थ आहे. अर्थात् श्रीमंतीपासून प्राप्त होणारी ही सत्ता ज्यांच्यावर गाजवावयाची ते जितक्या प्रमाणांत कमीअधिक दरिद्री असतील, तितक्या प्रमाणांत ती कमी अथवा अधिक होत असते. समाजांत आपल्याइतकेच श्रीमंत असणाऱ्या लोकांची संख्या व पुरवठा मर्यादित असणाऱ्या कोणत्याहि मालास आपण देऊं करूं तितकीच किंमत येण्यास पुढें येणाऱ्या लोकांची संख्या, यांच्याशीं ही सत्ता नेहमींच व्यस्त प्रमाणांत असते. जर एकादा गवई गरीब असला आणि त्याच्या गाण्यास मोबदला देणारा एकच मनुष्य तेथें असला तर

तो फार थोड्या पैशांवर गाण्यास तयार होईल, पण जर तेथ पैसेवाले दोन किंवा तीन लोक असतील तर त्याच्यापैकीं जो जास्तींत जास्त मोबदला देईल, त्यालाच तो गाणें गाऊन दाखवील. अशा प्रकारें या आश्रयदात्याच्या श्रीमंतीचें सामर्थ्य त्या कलावताच्या दारिद्र्यावर आणि त्याचें गायन ऐकूं इच्छिणाऱ्या सधन लोकांच्या संख्येवर अवलंबून असतें. ( ही सत्ता केवढीहि मोठी असली तरी नेहमी संशयास्पद व अपूर्णच असते, असें आपणास पुढें दिसून येईल. ) सारांश, वर म्हटल्याप्रमाणें श्रीमंत होण्याची कला या शब्दात केवळ आपणापाशीं मोठा द्रव्यसंचय करण्याची कला, एवढाच अर्थ सामान्यत: अभिप्रेत नसून आपल्या शेजाऱ्यापाशी कमी धन असेल अशी परिस्थिति निर्माण करण्याची कला हाहि अर्थ अंतिम दृष्ट्या त्यात अंतर्भूत होत असतो. अगदीं नेमक्या शब्दांत सांगावयाचें तर, आपणास अनुकूल अशी कमालीची विषमता निर्माण करण्याची कला, असें तिचें वर्णन करतां येईल.

अशा प्रकारची सामाजिक विषमता निर्माण होणे राष्ट्राला हितकारक आहे की अहितकारक आहे, याचा निर्णय केवळ तात्त्विक दृष्टीनें करतां येणार नाहीं. सामान्य लोकात जे अनेक अर्थशास्त्रीय हेत्वाभास रूढ आहेत, त्यांच्या बुडाशीं अशी आर्थिक विषमता ही नेहमींच हितप्रद असते हें अविवेकी व हास्यास्पद गृहीतकृत्य असल्याचें प्राय: दृष्टीस पडतें. या संबंधींचा त्रिकालाबाधित व अपरिहार्य नियम असा आहे कीं, ही विषमता कशा मार्गांनी निर्माण करण्यांत आली आहे, आणि त्या विषमतेचा उपयोग कोणत्या उद्देशानें करण्यांत येत आहे, या दोन गोष्टींवर तिचें हितकारित्व अवलंबून असतें. अन्यायांतून उत्पन्न होणारी सांपत्तिक विषमता निर्माण होत असता त्या राष्ट्राची हानि होत असते. तसेंच अन्याय करण्याच्या कामीं तिचा उपयोग होत असेल, तर ती अस्तित्वांत असेपर्यंत तिच्यामुळे त्या राष्ट्राची अधिकच हानि होत राहील. पण न्याय्य व्यवहारातून उत्पन्न होणारी सांपत्तिक विषमता निर्माण होत असतां राष्ट्रास ती हितप्रद होत असते आणि उदात्त दृष्टीनें तिचा उपयोग केला तर तिच्या स्थितिकालींहि तिच्यामुळें अधिकच हित होऊं शकतें. म्हणजे जर राष्ट्राची राज्यपद्धति सुव्यवस्थित असेल आणि त्यांतील लोक उद्योगी

असतील, तर त्याच्या निरनिराळ्या गरजा भागविण्याच्या कामांत व्यक्तीच्या विशिष्ट शक्तींचा उपयोग होईल. अशा प्रकारें निरनिराळ्या लोकांच्या आंगच्या कार्यक्षमतेची पूर्ण कसोटी लागून जी सामाजिक अवस्था निर्माण होईल, तींत विषमता असली तरी ती सुसंवादी असेल; कारण प्रत्येकास आपापल्या कार्याप्रमाणें व दर्जाप्रमाणें सत्ता व संपत्ति यांचा लाभ होत राहील. याच्या उलट राष्ट्रांतील लोक निरुद्योगी व राज्यपद्धति अव्यवस्थित असेल तर त्यातील उच्चनीचभाव त्या राष्ट्राच्या विकृतीचे निदर्शक असतील व त्यांत मिळणारें यश समाजद्रोहावर आधारलेलें असेल, व त्यांच्यापासून त्या राष्ट्रांतहि यशस्विता आणि दास्यावस्था यांच्यावर आधारलेले अव्यवस्थित, श्रेष्ठकनिष्ठ संबंध निर्माण होतील. पण पहिल्या प्रकारच्या राष्ट्रांतील सुसंवादी श्रेष्ठकनिष्ठतेहून ही विषमता भिन्न होईल. त्यांतील श्रेष्ठत्व अन्यायनिदर्शक आणि कनिष्ठत्व गुन्हेगारीचें व दुर्दैवाचें निदर्शक असेल.

राष्ट्रांतील संपत्तीचें अभिसरण हें मनुष्याच्या शरीरांतील रुधिराभिसरणासारखेंच असतें. उल्हसित वृत्तीमुळें अथवा आरोग्यदायक व्यायामामुळें जसा रुधिराभिसरणाचा वेग वाढतो, तसाच तो लज्जेच्या वृत्तीमुळें अथवा ज्वरामुळेंहि वाढूं शकतो. जीवनांतील जोमामुळें किंवा अंतःकरणांतील उबेमुळें ज्याप्रमाणें चेहेऱ्यावर लाली येत असते, त्याचप्रमाणें रोगग्रस्त विकारी चेहेऱ्यावरहि एक प्रकारची लाली येत असते.

हा दृष्टांत अगदीं सर्वांशीं लागू पडतो. शरीराच्या एकाद्या भागांत अधिक रक्त सांकळलें तर एकंदर प्रकृतीला रक्ताच्या कमतरतेमुळें अपाय घडतो, त्याचप्रमाणें समाजाच्या विशिष्ट अंगांत होणारा विकृत धनसंचय समाज–शरीरांतील उत्पादनशक्ति अखेरीस क्षीण बनविल्याखेरीज रहात नाहीं. संपत्तीची वाढ कशा प्रकारें होत असते, याची अगदीं साधी एक-दोन उदाहरणें तपासून पाहिल्यास हा परिणाम कसा घडतो त्याचा बरोबर उलगडा होऊं शकेल.

एका ओसाड समुद्रकिनाऱ्यावर दोनच खलाशी एकाद्या फुटलेल्या जहाजांतून बचावून तीरास लागले व त्यांना वर्षानुवर्षें आपल्याच श्रमावर उपजीविका करणें भाग पडलें, अशी कल्पना करूं.

त्यांची दोघांचीहि प्रकृति सुदृढ राहिली आणि दोघेहि एकमेकांशीं सलोख्यानें वागून धिमेपणानें उद्योग करूं लागले, तर त्यांना आपणांस सोईस्कर असें एकादें घर बांधितां येईल, पीक देणारी अशी कांहीं शेत-जमीन त्यांना आपल्या मालकीची बनवितां येईल आणि भावी कालांत उपयोगी पडतील अशा कांहीं वस्तूंचा साठाहि त्यांना आपल्याजवळ करून ठेवितां येईल. हीच खरी संपत्ति किंवा मालमत्ता होय. त्या दोघांनींहि तिच्या निर्मितीसाठीं सारखेच श्रम केले आहेत असें गृहीत धरल्यास त्या दोघांसहि तिचा समानतेनें उपभोग घेण्याचा हक्क प्राप्त होईल. या संपत्तीची न्याय्य विभागणी करणें आणि तिचें दक्षतेनें रक्षण करणें हेंच त्यांचें अर्थशास्त्र होईल. तथापि काहीं काळानंतर त्यांच्यापैकीं एकाद्यास समाईक शेतीपासून होणारा लाभ कदाचित् पसंत पडणार नाही; आणि म्हणून ते आपण खणून तयार केलेली जमीन समानतेनें विभागून घेतील आणि प्रत्येक मनुष्य आपल्या शेतात काम करून त्यावरच आपला निर्वाह करूं लागेल. समजा कीं, अशी व्यवस्था केल्यानंतर त्यांच्यापैकीं एक पेरणीच्या किंवा कापणीच्या हंगामाच्या ऐन वेळीं आजारी पडला आणि आपल्या शेतांतील काम करण्यास असमर्थ बनला.

स्वाभाविकपणेंच तो आपल्या पेरणीचें किंवा कापणीचें काम करण्याची दुसऱ्या मनुष्यास विनंति करील.

यावर त्याचा सहकारी शुद्ध न्यायबुद्धीनें त्यास म्हणूं शकेल कीं, "आज तुझ्यासाठी हें जादा काम मी करतों; पण मी तसें केलें तर पुन्हां केव्हां-तरी माझ्यासाठी तितकेंच काम करण्याचें तूं मला वचन दिलें पाहिजेस. आज तुझ्या जमिनीवर मला किती तास काम करावें लागेल, तें मी मोजून ठेवतों आणि मला जेव्हां तुझ्या मदतीची गरज असेल व तुला ती देणें शक्य असेल, तेव्हां माझ्या शेतांत तितकेच तास काम करण्याचें तूं मला लेखी अभिवचन दिलें पाहिजेस." समजा कीं, त्या मनुष्याचा आजार तसाच चालू राहिला आणि अनेक कारणांमुळें कित्येक वर्षेंपर्यंत त्याला दुसऱ्याची मदत घ्यावी लागली. मी बरा होतांच तूं सांगशील त्याप्रमाणें तूं जितके तास काम माझ्याकरितां केलेंस, तितकेच तास मीहि तुझ्याकरितां करीन असें तो प्रत्येक वेळीं लिहून देत गेला, तर

तो आजारी मनुष्य बरा झाल्यावर या दोन मनुष्यांची परिस्थिति कोणत्या प्रकारची होईल बरें ?

समष्टि–दृष्टीनें विचार केल्यास तो मनुष्य आजारी पडला नसता तर त्यांची जी स्थिति राहिली असती, त्यापेक्षा त्यांची स्थिति अधिक गरीबीची होईल: कारण त्याच्या आजारीपणांत त्याचे श्रम बंद पडल्यामुळें त्या श्रमामुळें उत्पन्न व्हावयाची संपत्ति निर्माण झाली नाही. अधिक श्रम करण्याची आवश्यकता निर्माण झाल्यामुळें त्याच्या मित्रानें जरी नेहमीपेक्षां कांहीं अधिक काम केलें असलें, तरी तो काळ आणि ती शक्ति दुसऱ्याच्या शेतावर खर्ची पडल्यामुळें त्याच्या स्वतःच्या जमिनीचें व मालमत्तेचें नुकसान झालें असलें पाहिजे, आणि ते दोघेहि सुदृढ प्रकृतीचे व उद्योगमग्न असते तर त्यांची संयुक्त मालमत्ता जितक्या किंमतीची झाली असती, त्याहून तिची किंमत आता कमी होणार हें निश्चित.

पण त्यांचे परस्परांशीं असणारे संबंधहि आता अगदी बदललेले असतील. त्या आजारी मनुष्यानें कांही वर्षे दुसऱ्याचें काम करण्यास बांधून घेतलें आहे, एवढेंच नाही, तर त्याची साठवलेली संपत्तीहि बहुधा संपुष्टांत आलेली असेल, आणि म्हणून आपणास लागणाऱ्या अन्नासाठीं त्याला कांहीं काळ दुसऱ्यावर अवलंबून राहाणें भाग होईल. हें अन्न मिळविण्या-साठीहि आपले श्रम अधिक प्रमाणांत दुसऱ्याला बांधून देणें हा एकच मार्ग त्याला आतां शिल्लक उरलेला असेल.

त्यानें दिलेलीं लेखी वचनें हीं पूर्णपणें बंधनकारक आहेत असें समजलें ( सुधारलेल्या राष्ट्रांत अशी कायद्यानेंच तरतूद केलेली असते ) तर आजपर्यंत ज्या मनुष्यानें दोघांचेंहि काम केलें, त्याला आतां वाटल्यास पूर्ण विश्रांति घेता येईल आणि आपल्या सहकाऱ्याकडून केलेले करार पुरे करून घेतां येतील. इतकेंच नाही, तर त्याला लागणारें अन्न पुरविण्याबद्दल त्याचे श्रम वाटेल तितक्या प्रमाणांत बांधून घेणारे नवे करार त्याच्यावर लादून स्वतःचा काळ आळसांत घालविता येईल.

या सर्व प्रकारांत अथपासून इतिपर्यंत ( सामान्य रूढ अर्थानें ) यत्किंचितहि बेकायदेशीरपणा होणार नाही. अर्थशास्त्राच्या दृष्टीनें

पुढारलेल्या अशा या त्याच्या अवस्थेंत जर एकादा तिऱ्हाईत त्या किनाऱ्यावर आला, तर व्यापारीदृष्टीनें त्याच्यांतील एक श्रीमंत व दुसरा गरीब असल्याचें त्याला आढळेल. पहिला मनुष्य आपला काळ आळशीपणानें घालवीत आहे आणि दुसरा दोघांचेंहि काम करीत असून कंजुषपणानें राहात आहे व भावी काळांत केव्हातरी आपलें गमावलेलें स्वातंत्र्य आपणास प्राप्त होईल, या आशेवर जगत आहे हें पाहून बहुधा त्याला बरेंच आश्चर्य वाटेल.

व्यापारीदृष्टीनें निरनिराळ्या लोकांच्या संपत्तींत विषमता निर्माण होऊन श्रीमंती आणि दारिद्र्य अस्तित्वांत येण्याचे जे अनेक प्रकार आहेत, त्याचें हें एक उदाहरण होय. आपण घेतलेल्या उदाहरणांत असेंहि होणें शक्य आहे कीं, त्या दोहोंपैकीं एक मनुष्य प्रथमपासून बुद्धिपुरःसर आळसांत राहिला असता व आजच्या सुखाच्या आशेनें त्यानें आपलें भावी आयुष्य गहाण टाकिलें असतें; किंवा आपली शेती अव्यवस्थितपणें केल्यामुळें त्याला अन्नासाठीं व मदतीसाठीं आपले भावी श्रम शेजाऱ्यास गहाण टाकणें भाग पडलें असतें. पण वाचकांस जी गोष्ट समजावून सांगण्याची माझी इच्छा आहे ती म्हणजे, दुसऱ्यांच्या श्रमांवर हक्क निर्माण करणारी व्यापारीसंपत्ति दिसूं लागली, याचा अर्थ मालमत्तारूप खऱ्या संपत्तीची त्या समाजांत वाण पडली असा असतो. हा सिद्धांत अशासारख्या अनेक उदाहरणांना सामान्यत्वानें लागू पडतो.

व्यापारांतील सामान्य व्यवहारास अधिक लागू पडणारें असें दुसरें एक उदाहरण घेऊं. अशी कल्पना करा कीं, वरील एकाकी राज्यांत दोहोंच्या ऐवजी तीन लोक आहेत आणि तीन निरनिराळीं शेतें करण्यासाठीं त्यांना त्याच किनाऱ्यावर परस्परापासून थोडें दूर जाऊन रहावें लागलें. त्यांपैकीं प्रत्येक जमिनींत निरनिराळ्या प्रकारचें पीक होत असून प्रत्येकास दुसऱ्याच्या शेतांतील मालाची कमीअधिक प्रमाणांत गरज आहे. समजा कीं, तिघांचाहि कामाचा काळ वांचावा म्हणून तो तिसरा मनुष्य एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं माल नेऊन पोहोंचता करण्याचेंच काम स्वतःकडे घेतो आणि एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेलेल्या

मालाच्या प्रत्येक गठ्ठयाबद्दल अथवा तो देऊन आणलेल्या तशाच गठ्ठयाबद्दल पुरेसें वेतन घेण्याची शर्त घालतो.

जर मालाची नेआण अथवा वाहतुक करणारा हा मनुष्य प्रत्येक शेतकऱ्यास दुसऱ्याकडून जो माल हवा असेल तो योग्य वेळीं आणून देईल तर त्या दोनहि शेतकऱ्यांचें काम भरभराटीस लागेल आणि त्या छोट्या समाजाची संपत्ति अथवा उत्पन्न अधिकात अधिक होईल. याच्या उलट आपण अशी कल्पना करूं कीं, त्या शेतकऱ्यांना एकमेकाशी संबंध ठेवण्याचें या फिरत्या दलालाखेरीज दुसरें कोणतेंहि साधन नाही. अशा परिस्थितीत बराच काळ त्या दोघांच्याहि शेतीचें पूर्ण निरीक्षण केल्यानंतर आपणांजवळ दिलेल्या मालापैकीं कांही माल तो गुप्तपणें सांठवून ठेवूं लागला आणि जेव्हां त्या दोघांना त्या मालाची गरज अत्यंत तीव्रतेनें भासूं लागेल तेव्हां त्याना तो देऊन त्याच्या मोबदला त्यांच्याकडून जास्तीत जास्त माल उकळूं लागला. अशा परिस्थितींत आपली संधि साधण्याचा चातुर्यानें व दक्षतेनें प्रयत्न केल्यास त्या दलालाला त्या दोन्ही शेतांवर निर्माण होणाऱ्या बहुतेक जादा संपत्तीचा मालक निश्चितपणें बनता येईल आणि अखेरीस एकाद्या कडक दुष्काळाच्या अथवा निर्वाणीच्या प्रसंगीं ती दोन्ही शेतें स्वतः विकत घेऊन त्याच्या पूर्वीच्या मालकांना तो आपले नोकर अथवा मजूर बनवूं शकेल, हें उघड आहे.

आधुनिक अर्थशास्त्राच्या तत्त्वांचें कांटेकोरपणानें अवलंबन करून संपादन केलेल्या संपत्तीचें हें एक उदाहरण होऊं शकेल. पण राष्ट्रीय दृष्ट्या किंवा त्या तीन लोकांचा एक समाज समजून विचार केल्यास, तो व्यापारी न्याय्य नफा मिळवून संतुष्ट राहिला असता, तर त्या तिघाची सामुदायिक संपत्ति जितकी झाली असती, तिच्याहून ती आतां कमी झालेली आहे हें मागील उदाहरणापेक्षांहि येथें अधिक स्पष्ट दिसून येईल. त्या मध्यंतरीच्या काळांत दोनहि शेतकऱ्याचीं कामें अगदीं खुरटलीं असलीं पाहिजेत. तसेंच अडचणीच्या वेळीं अवश्य त्या मालाचा भरपूर पुरवठा न झाल्यामुळें, केवळ जीवितरक्षणासाठी करावे लागणारे कष्ट अधिक वाढले असलें पाहिजेत व कामापासून मिळणाऱ्या लाभाची शाश्वति कमी झाली असली पाहिजे. यामुळें त्यांचा उत्साहभंग होऊन

त्यानी केलेल्या श्रमाचें फलहि पुष्कळच कमी पदरांत पडलें असलें पाहिजे. यामुळें तो प्रामाणिकपणें वागला असता, तर त्या दोन्ही शेतकऱ्यांच्या व त्याच्या स्वतःच्या कोठारात मिळून एकूण जी संपत्ति सांठली असती, तिच्या नुकसानीची भरपाई त्यानें साठविलेली संपत्ति जमेस धरली तरी, होऊं शकत नाही.

म्हणून केवळ नफ्याच्याच दृष्टीनें नव्हे, तर राष्ट्रीय संपत्तीच्या कमी-अधिक निर्मितीच्या दृष्टीनेंहि हा सर्व प्रश्न अंतीं तात्त्विक न्यायप्रस्थापनेचा प्रश्न बनतो. एकाद्या राष्ट्रात साठलेल्या संपत्तीकडेच केवळ पाहून तिच्यामुळें त्या राष्ट्राचें हित होणार आहे की अहित होणार आहे, याचा निर्णय करणें शक्य नसतें. बीजगणितांतील संख्येच्या पाठीमागें धन किंवा ऋण जें चिन्ह असेल, तें पाहून आपण तिची किंमत ठरवितों, त्याच-प्रमाणें या संपत्तीच्या मागें कोणतें नैतिक चिन्ह आहे, तें पाहून आपणांस तिचें खरें मूल्य ठरवावें लागेल. एकादी विशिष्ट व्यापारी—संपत्ति प्रामाणिक उद्योग, वाढती श्रमशक्ति आणि उत्पादक संशोधन यांची निदर्शक असूं शकेल किंवा विनाशक विलास, निष्ठुर जुलूम आणि विघातक वंचना याचीहि निदर्शक असूं शकेल. अरक्षित ठिकाणीं ठेवलेलें धान्य अवेळी पडणाऱ्या पावसानें भिजून जातें, त्याप्रमाणें कांहीं धनसंचय मानवी अश्रूंनीं भारावलेले असतात आणि कांही सोनें वस्तुतः हिणकस असूनहि सूर्यप्रकाशात अधिक चमकदार दिसतें.

धनसंचयाच्या अंगीं असणारे हे गुण केवळ नैतिक किंवा भावकल्पित असून त्यांच्याकडे श्रीमान् होऊं इच्छिणाऱ्या मनुष्यास वाटेल तर दुर्लक्ष करतां येईल, असें समजूं नका. संपत्तीच्या आगचे हे गुण अगदीं यथार्थतेनें भौतिक असेच आहेत आणि त्यांच्यामुळें प्रत्येक धनसंचयाचें मूल्य इतक्या प्रमाणांत कमीअधिक होत असतें की, त्याची गणनाहि करतां येणार नाहीं. धनसंपादनाचे कांही काही प्रकार असे असतात कीं, त्यांच्या-मुळें तें संपादन करणारांना मिळणाऱ्या संपत्तीहून दसपट संपत्ति इतरत्र निर्माण होऊं शकते. याच्या उलट कांहीं प्रकारांमुळें तितक्याच पटीनें सामाजिक संपत्तीचा विनाश होत असतो. कांही प्रकारांमुळें कित्येकांचे प्रबल बाहू पक्षघात झाल्याप्रमाणें लुळे पडतात. अनेकांच्या उत्साही

मनाचा धीर खचून जातो. अनेकांचे उत्पादनव्यापार स्थगित होतात. कित्येकांच्या श्रमशक्तीचा अपव्यय होऊं लागतो. अनेक क्रूर संहार-देवतांची वैभवदेवता म्हणून मंदिरें उठविण्यात येतात, पण त्याच्या सभोंवार सर्वभक्षक अग्नीची होमकुंडें धगधगीत पेटलेली असतात. अशा प्रकारें संपत्ति म्हणून जी भासमान होते, ती वस्तुतः दीर्घ विपत्तीचें पुरोगामी मायावी चिन्हच प्रायः ठरते. बहुमोल संपत्तीनें भरलेलें एकादें व्यापारी जहाज एकाद्या चाच्यानें भुलावणी दाखवून तें फोडण्याच्या उद्देशानें किनाऱ्यालगतच्या खडकाजवळ न्यावें, आणि तें फुटल्यानंतर त्यातील मूठभर नाणी स्वसंपादित संपत्ति म्हणून पुढें करावीत, अथवा सैन्याबरोबर जाणाऱ्या एकाद्या बाजारबुणग्यानें शूर सैनिक रणांगणात मरून पडले असतां, त्याच्या अंगावरील फाटक्या कपड्यांचें एकादें गाठोडें आपली संपत्ति म्हणून मिरवूं लागावें, किंवा जेथें स्वकीय व परकीय असे दोघेहि गाडले जाणार आहेत, अशा कबरस्तानांतील एकाद्या जमिनीवर मालकी सांगून एकाद्यानें पैसा मिळवावा अशासारखेंच या संपत्तीचें स्वरूप असतें.

आणि म्हणून संपादनकार्याच्या नैतिक स्वरूपाकडे दुर्लक्ष करून धनार्जनाच्या मार्गासंबंधी समाजाला उपदेश करतां येईल, किंवा खरेदीचे व नफा मिळविण्याचे सामान्य तांत्रिक नियम एकाद्या राष्ट्रास सांगतां येतील, अशी कल्पना करणें याहून लोकांना दुर्मार्गवर्ती बनविणारी उन्मादक भूल दुसरी कोणतीहि आढळणार नाही. "जेथें स्वस्तांत स्वस्त माल मिळेल तेथें तो खरेदी करा व जेथें तो महागांत महाग विकला जाईल तेथें नेऊन विका" या आधुनिक व्यापारशास्त्रांतील सूत्राइतकी मानवी बुद्धीला लज्जास्पद दुसरी कल्पना कोठल्याहि इतिहासांत अद्यापि मला आढळलेली नाही. राष्ट्रीय अर्थशास्त्राला संमत असें वर्तनतत्त्व म्हणून त्याचा केव्हांहि पुरस्कार करतां येणार नाहीं. जेथें जो माल स्वस्त मिळेल, तेथें तो घ्या ? होय, पण तेथें तो माल कशामुळें स्वस्त बनला ? तुमच्या घराला आग लागून त्याच्या लांकडांचे कोळसे झाले, तर तेथें कोळसा स्वस्त होऊं शकेल आणि एकादा धरणीकंप होऊन गेला, तर रस्त्यांत विटा मुबलक व स्वस्त दरानें मिळतील. पण म्हणून आग आणि

धरणीकंप याची राष्ट्राला हितकारक गोष्टीत गणना करतां येणार नाही. महागात महाग विकेल, तेथें नेऊन आपला माल विका ? होय, अगदी खरें; पण तुमचा माल इतका महाग कशामुळें विकला ? तुम्ही बनवलेला पाव चांगल्या भावानें आज विकला गेला. आपणास पुन्हां पाव विकत घ्यावा लागणार नाहीं म्हणूनच एकाद्या मरणोन्मुख मनुष्यानें आपल्या जवळचें शिल्लक असलेलें एकच एक नाणें देऊन, तो विकत घेतला काय ? किंवा उद्या वाटेल ती किंमत देऊन जो तुमचें शेतहि विकत घेईल अशा एकाद्या धनाढ्याला, तुम्ही तो विकला काय ? अथवा ज्या पेटीत तुमची पुंजी ठेवली असेल, ती पेटी लुटावयास निघालेल्या एकाद्या आडदांड सैनिकाला तो तुम्ही विकला काय ?

यापैकीं एकाहि गोष्टीचें ज्ञान होणें तुम्हांस शक्य नाहीं. तुम्हांस फक्त एकच गोष्ट कळणें शक्य आहे, आणि ती म्हणजे, तुमचा हा व्यवहार न्यायाचा व प्रामाणिकपणाचा होता किंवा नाहीं. या बाबतीत एवढ्या एकाच गोष्टीचा तुम्ही विचार केला, तरी पुरे आहे. जगांतील मारामाऱ्या व लुटालुटी बंद होतील अशी अवस्था त्यास अंती प्राप्त होण्यासाठीं मला जेवढें करता येणें शक्य होतें, तेवढें मी केलें आहे, अशी खात्री येवढ्यानें तुम्हास बाळगता येईल. साराश, या व्यवहारांतील प्रत्येक प्रश्न अखेरीस न्यायप्रस्थापनेच्या प्रश्नांत जाऊन विलीन होतो, हें अशा प्रकारें सिद्ध होत आहे. इतकी भूमिका तयार केल्यानंतर न्यायप्रस्थापनेच्या या प्रश्नाचा विचार मी पुढील लेखात करणार आहें. येथें वाचकाच्या विचारासाठी फक्त पुढील तीन अखेरचे मुद्दे मांडीत आहें.

मागें असें सिद्ध करण्यांत आलें आहे कीं, पैशाच्या अंगचा मुख्य गुण किंवा त्याची खरी किंमत म्हणजे, त्यामुळें इतर माणसांवर मिळणारी सत्ता हीच होय. ही सत्ता न मिळेल तर भौतिक मालमत्ता केवढीहि मोठी असली, तरी ती निरुपयोगी होईल आणि ज्याला अन्य मार्गानें अशी सत्ता प्राप्त करून घेतां येईल, त्यास सापेक्ष दृष्ट्या ती अनवश्यक ठरेल. मानवी प्राण्यावर पैशावाचून अन्य साधनांनी अशी सत्ता मिळूं शकते. मागें मी म्हटल्याप्रमाणें पैशानें मिळणारी सत्ता ही नेहमींच अपूर्ण व संशयास्पद असते. पुष्कळ गोष्टी अशा आहेत कीं, त्या पैशाच्या

आटोक्यांत येऊं शकत नाहींत व इतर अनेक अशा आहेत कीं, ज्या पैशानें आपण राखून ठेवूं शकत नाही. सोनें देऊन विकत न मिळणारी अशीं अनेक प्रकारचीं सुखें मनुष्यें एकमेकांना देऊ शकतात व त्यांच्यामध्यें अशा अनेक प्रकारच्या निष्ठा आढळतात कीं, ज्यांचें मूल्य सोन्यानें मोजतां येणार नाहीं. वाचक म्हणतील कीं, या गोष्टी अगदी सर्वमान्य आहेत. होय, पण ही जी नैतिक शक्ति आहे, ती न दिसणारी व न मापतां येणारी असली तरी तिच्या अंगीं, जडस्वरूपी नाण्यांच्या अंगीं असणारी बहुमोल अशी आर्थिक शक्ति आहे ही गोष्ट मात्र तितकीशी सर्वमान्य झालेली नाही. ती तशी व्हावी हीच माझी इच्छा आहे. एकाद्या मनुष्याच्या हातीं जर हें अदृश्य सोनें असेल, तर तो केवळ आपल्या अंगुलीनिर्देशानें अथवा हस्तस्पर्शानें जें कार्य करूं शकेल तें दुसऱ्या मनुष्यांस सोन्याचा पाऊस पाडूनहि करतां येणार नाही. शिवाय हें अदृश्य सोनें असें आहे कीं, त्याचा व्यय केला असतां तें संकोच पावत नाहीं. अर्थशास्त्रज्ञांना जरी त्याचें बरोबर मोजमाप करता आलें नाहीं, तरी त्याच्या अस्तित्वाकडे ज्या दिवशीं त्यांचें लक्ष जाईल तो सुदिन होय.

खेरीज, संपत्तीचें खरें रहस्य जर तिच्यामुळें प्राप्त होणारी इतर मनुष्यांवरील सत्ता हेंच असेल, तर जेव्हां ही दृश्य अथवा नामधारी संपत्ति अशी सत्ता देऊं शकणार नाहीं, तेव्हां आपलें मुख्य कार्यच ती करूं शकत नाहीं व म्हणून ती संपत्ति या नांवालाच पात्र उरली नाही, असें म्हणावें लागेल. आमच्या कामगारवर्गावरील आमची सत्ता अबाधित असल्याचें अलीकडे इंग्लंडांत दिसत नाहीं. आपले पगार आपणांस नियमितपणें मिळत नाहींत, अशा समजुतीनें आमचे नोकर दंगामस्ती करून वारंवार आमच्या दिवाणखान्यांत घुसत असल्याचें दिसतें. एकाद्या मालकाच्या दिवाणखान्यांत असे प्रकार एक दिवसाआड घडूं लागले, तर त्याच्या मालमत्तेच्या भवितव्यतेचें हें दुश्चिन्हच आहे असें आपण मानूं.

तसेंच आमच्या नोकरांच्या समाधानवृत्तीचा प्रश्न सोडून दिला, व त्यांच्या सुखसोईचा विचार केला, तरीहि आमच्या संपत्तीचें सामर्थ्य

मर्यादितच दिसतें. आमच्या स्वयंपाकघरांतील नोकरांचे कपडे अपुरे व गलिच्छ असून ते अर्धपोटी रहात असल्याचें दिसतें. यावरून आमच्या घरांतील संपत्ति अगदीं तात्त्विक स्वरूपाची किंवा जमाखर्चाच्या चोपड्यांत दाखविण्गापुरतीच असावीसें दिसतें.

आतां अखेरच्या मुद्याकडे वळूं. ज्या अर्थी मनुष्यांवर प्राप्त होणारी सत्ता हाच संपत्तीच्या आंगचा मुख्य गुण आहे, त्या अर्थी जिच्यामुळें अधिक लोकावर व श्रेष्ठ दर्जाच्या लोकांवर सत्ता मिळेल तिचें मोल अधिक समजणें सयुक्तिक होणार नाहीं काय ? थोडासा विचार केल्यास कदाचित् असेंहि दिसून येईल कीं, लोक हीच खरी संपत्ति आहे. पूर्वी बादशाही घोड्यांना बहुमोल खोगीर किंवा लगाम घालीत असत व तें रानटी लोकांना मोठें आकर्षक व सुंदर वाटत असे. ज्या सोन्याच्या तुकड्यांच्या सहाय्यानें आम्ही लोकांना काम करावयास लावितों, ते म्हणजे आमच्या नोकरांना आपल्या काबूंत ठेवण्यासाठी घातलेले लगामच होत. पण त्यांच्या गळ्यांतील ते घुंगूर आणि तोंडांतील ते लगाम काढून टाकून जर त्यांना आपण आपल्या इच्छेप्रमाणें वागवूं शकलों, तर त्यांच्या त्या लगामाऐवजी त्यांचेंच आम्हांस अधिक मोल वाटूं लागेल. खरें पाहिल्यास पुढें असें आढळून येईल की, संपत्तीचे खरे प्रवाह हे डोंगरकपारीत दडलेले नसून ते मानवी शरीराच्या हाडामांसांतून वाहात आहेत, आणि सर्व संपत्तीचें अंतिम फल अथवा तिचा अंतिम उद्देश हाच असला पाहिजे कीं, तिच्यामुळें राष्ट्रांत भरदार छात्यांचे, पाणीदार डोळ्यांचे आणि उल्हसित अंतःकरणांचे असंख्य लोक निर्माण व्हावे. पण आमच्या आधुनिक संपत्तीचा कल याच्या अगदीं विरुद्ध आहे असें मला वाटतें. पुष्कळ मोठी लोकसंख्या असणें, हें संपत्तीच्या वाढीस पोषक नाहीं, निदान अशा बहुजन संख्येच्या डोळ्यांतील तेज मंद राहिलें व त्यांच्या छात्या अरुंद राहिल्या तर तेंच धनोत्पादनास पोषक होईल, असें बऱ्याच अर्थशास्त्रज्ञांचें मत असावेसें दिसतें.

तथापि राष्ट्रांतील सर्व कारखान्यांत, उत्कृष्ट प्रतीचे आत्मे निर्माण करणारा कारखानाच परिणामीं सर्वांत अधिक किफायतशीर ठरणार नाहीं काय ? हा एक गंभीरपणें विचार करण्यासारखा प्रश्न आहे व तें काम मी वाचकांच्या विचारशक्तीवरच सोपवितों. इतकेंच नाहीं, तर ज्याचें आज

कोणास स्वप्नहि पडूं शकत नाहीं अशा दूरच्या भाविकाळांत आपल्या भौतिक मालमत्तेचा सर्व लोभी विचार राष्ट्राच्या रानटी अवस्थेचा द्योतक आहे असें मानून इंग्लंड तो दूर फेकून देईल अशीहि कल्पना मला करतां येते. सिंधु नदीच्या वाळवंटांत सांपडणारें सोनें अथवा गोवळकोंड्याच्या खाणीत सांपडणारीं रत्नें, हीं मागासलेल्या राष्ट्रांतील घोड्यांच्या जिनांवर किंवा गुलामांच्या फेट्यांवर आढळलीं, तरी ख्रिस्ती धर्माची दीक्षा घेतलेली आंग्लभूमि, या सर्व वैभवाचा त्याग करील, व सद्गुणसंपत्तीनें सुशोभित झालेले आपले पुत्र जगापुढें उभे करून ती म्हणेल की,

"हीं पहा माझीं रत्नें."



## निबंध ३ रा

## ऐहिक न्यायदान

इसवी सनापूर्वी कांहीं शतकें आपला बहुतेक धंदा गोल्डकोस्टमध्यें करणारा एक ज्यू व्यापारी होऊन गेला. त्या काळांत त्यानें फार मोठी संपत्ति मिळविली व तो व्यवहारांत मोठा चाणाक्ष होता अशीहि त्याची ख्याति होती. त्यानें आपल्या कीर्दीच्या वह्यांत आर्थिक व्यवहारांसंबंधीं कांहीं सर्वसामान्य सूत्रें लिहून ठेविलीं आहेत, आणि मोठी आश्चर्याची गोष्ट म्हणजे तीं आजपर्यंत टिकून राहिलीं आहेत. मध्ययुगांत धंदेवाईक व्यापारी, व विशेषतः व्हेनिसमधील व्यापारी, या सूत्रांना फारच मान देत असत आणि त्या ज्यूसंबंधींची पूज्यबुद्धि व्यक्त करण्यासाठीं व्हेनिसमधील एका प्रसिद्ध सार्वजनिक इमारतीच्या कोपऱ्यावर त्यांनीं या वृद्ध ज्यू व्यापाऱ्याचा एक पुतळाहि करून बसविला होता. आधुनिक व्यापारी धोरणाच्या सर्वस्वी विरुद्ध अशीं हीं तत्त्वें असल्यामुळें अलीकडे

तीं बरींच मागें पडलीं आहेत. तरीहि त्यांतील एकदोन उतारे मी येथें देणार आहें. कारण, एकतर त्यांच्या नाविन्यामुळें वाचकांना ते चित्तवेधक वाटतील, आणि मुख्यतः म्हणजे मागील लेखांत न्यायार्जित व अन्यायार्जित संपत्ति असा जो भेद मीं दाखवून दिला, तदनुसार वर्तन करणें व्यवहारदक्ष आणि द्रव्यार्थी व्यापाऱ्यासहि शक्य असतें व तसें केल्यास त्याला आपल्या धंद्यांत अपयश येतें असेंहि नाहीं, हें वाचकांस दिसून येईल. या भेदाचेंच अधिक सविस्तर विवेचन मी या लेखात करणार आहें.

उदाहरणार्थ, एके ठिकाणीं तो लिहितो, " ज्यांच्या दृष्टीपुढें खोटं बोलून संपत्ति मिळविण्याचें अमिष नाचत असतें ते मृत्यूचाच पाठलाग करीत असतात." अशाच अर्थाचें त्याचें दुसरेंहि एक वचन आहे ( पुनरुक्तीची त्याला विलक्षण संवय आहे ). " दुष्टपणानें मिळविलेल्या संपत्तीपासून कांहींहि फायदा होत नाहीं, पण न्यायी मनुष्य मृत्यूच्या भीतींतून मुक्त होतो." या दोनहि वचनांत अन्यायानें मिळविलेल्या संपत्तीचा खरा परिणाम अथवा अंतिम फल मृत्यु हेंच असल्याचें सांगितलें आहे, हें लक्षांत घेण्याजोगें आहे. या वचनांत " खोटें बोलून " याऐवजी " खोटीं लेबलें, खोटीं नांवें, ढोंग अथवा जाहिरातबाजी इत्यादींच्या साहाय्यानें " असे शब्द घातले, तर आधुनिक व्यापारी व्यवहारांशीं या वचनांचा काय संबंध आहे तें आपल्या स्पष्टपणें नजरेस येईल. अशा प्रकारच्या व्यवहारांतील मानवी खटाटोपास 'मृत्यूचा पाठलाग' हें त्यानें दिलेलें नांवच साजतें. नेहमीं बोलतांना जणू काय काळ आपल्या पाठीमागें लागला आहे व आपण त्याच्यापासून दूर पळत आहोंत, अशा अर्थाचे शब्द आपण योजीत असतों; पण वस्तुतः तसें फारच क्वचित् घडतें. सामान्यतः सुंदर आणि वैभवसंपन्न अशा स्वरूपांत मृत्यु आपणांस भेटावयास येत असतो. हें त्याचें वैभव खरें नसून केवळ दिखाऊ असतें. त्याचे कपडे खोट्या जराचे असतात. आपणच त्याचा वेड्यासारखा पाठलाग करीत असतों व तो आपणांपासून दूर पळून आड लपण्याचा प्रयत्न करतो. अखेरीस आयुष्याच्या अंतीं या पाठलागांत आपण यशस्वी झालों, म्हणजे कोणत्या स्वरूपांत आपणांस तो सांपडतो ?–प्रेतवस्त्रें, माती आणि वेदना !

तो व्यापारी पुढें म्हणतो, " जे आपलें धन वाढविण्यासाठीं गरिबांवर जुलूम करतील ते निश्चित दरिद्री होतील." पुन्हां अधिक कडक शब्दांत तो लिहितो, " एकादा मनुष्य गरीब आहे म्हणून त्याला लुटूं नका आणि व्यापार करतांना विपन्न लोकांवर जुलूम करूं नका; कारण जे दुसऱ्यांना दुर्गतीला नेतात त्यांना परमेश्वर दुर्गति देतो. "

गरिबाला तो गरीब म्हणून लुटणें, ही एक व्यापारी स्वरूपाची चोरीच आहे. एकाद्या मनुष्याच्या अडचणीचा फायदा घेऊन त्याची श्रमशक्ति किंवा मालमत्ता कमी भावानें विकत घेणें, ही गोष्ट याच सदरांत पडते. दरवडेखोरांच्या दरवड्याचा नेहमींचा प्रकार याच्या अगदीं विरुद्ध असतो. तो श्रीमंताला श्रीमंत म्हणून लुटीत असतो. पण या वृद्ध व्यापाऱ्याला चोरीच्या या सामान्य प्रकाराची तितकीशी स्मृति होत असल्याचें दिसत नाहीं. कदाचित् याचें कारण असें असेल कीं, हा चोरीचा प्रकार गरिबांना लुटण्याच्या प्रकारापेक्षां अधिक धोक्याचा व कमी किफायतशीर असल्यामुळें, धूर्त लोक त्याचें क्वचित्च अवलंबन करीत असतात.

पण या सर्वांपेक्षां अत्यंत महत्त्वाचें आणि खोल अर्थानें भरलेले असे दोन उतारे आहेत; ते असेः

" श्रीमंत आणि गरीब हे एकमेकांसमोर उभे आहेत. परमेश्वरच त्यांचा निर्माता आहे. "

" श्रीमंत आणि गरीब हे एकमेकांसमोर उभे आहेत. परमेश्वर हाच त्यांचा प्रकाश आहे. "

ते एकमेकांसमोर उभे आहेत. शब्दशः भाषांतर केल्यास ते एकमेकांच्या मार्गांत उभे आहेत असें होतें. म्हणजे नद्यांचे प्रवाह समुद्राकडे जावेत, अथवा विजेनें भरलेल्या ढगांतील शक्ति एकमेकांत संक्रमित व्हावी, हा जसा निसर्गाचा नियम आहे, त्याचप्रमाणें दारिद्र्य आणि श्रीमंती यांची एकमेकांवर क्रिया-प्रतिक्रिया घडावी आणि श्रीमंत व गरीब हे एकमेकांसमोर उभे असावेत, असा निसर्गाचा कायदा आहे, व जग आहे तोंपर्यंत तो कायम टिकेल. कारण " परमेश्वरच त्यांचा निर्माता आहे." पण त्यांचे परस्परांशीं होणारे व्यवहार सौम्य आणि न्यायी असूं शकतील किंवा ते

उत्पातकारी आणि विघातकी असूं शकतील. त्यांच्या या व्यवहारांमुळें कदाचित् समाजावर एखाद्या सर्वभक्षक अतिवृष्टीसारखीं अथवा अवर्षणासारखीं किंवा कृष्णमेघांतून होणाऱ्या विद्युत्पातासारखीं अरिष्टें कोसळतील, किंवा त्याच व्यवहारांतून निर्माण होणारी शक्ति जीवनदायक अग्नीप्रमाणें अथवा दुरून ऐकूं येणाऱ्या मंदमधुर घनगर्जनेप्रमाणें समाजाला सुखकारकहि होईल. यापैकीं कोणता परिणाम घडावयाचा तें श्रीमंत आणि गरीब या दोघांवरहि अवलंबून असतें. " परमेश्वर हाच त्यांचा प्रकाश आहे " हें या दोघांनाहि समजलें पाहिजे. गूढ अशा मानवी संसारांत एकमेकांचें ज्ञान करून देणारा व जीवनाचा मार्ग दाखविणारा याहून दुसरा कोणताहि प्रकाश नाहीं. याच प्रकाशास त्या व्यापाऱ्यानें दुसऱ्या एका सूत्रांत " न्यायाचा प्रकाश " असें नांव दिलें आहे; आणि सर्वांना आरोग्य देणारा, साहाय्य करणारा, पूर्ण बनविणारा आणि सर्वांचें सख्य घडविणारा हा प्रकाश सर्वत्र पसरेल अशी श्रद्धा व्यक्त केली आहे. कारण, या न्यायाच्या आश्रयानेंच सर्वांना आराम वाटणें खरोखर शक्य आहे. केवळ प्रेमानें, श्रद्धेनें अथवा आशेनें हें घडणार नाहीं. मनुष्यें मूलतः न्यायी नसतील, तर त्यांचें प्रेम आंधळें असूं शकेल, आणि त्यांची श्रद्धा भ्रामक असूं शकेल. दानधर्म करून गरिबांना साहाय्य करतां येईल, अशी भ्रामक कल्पना श्रेष्ठ लोकहि पिढ्यानुपिढ्या करीत आले आहेत. गरिबांना दान करून अथवा त्यांचें सांत्वन करून उतावीळ न होण्याचा व आशा न सोडण्याचा उपदेश अनेक प्रकारें त्यांनीं केला आहे; पण ' त्यांना न्याय द्या ' या परमेश्वराच्या एकमेव आज्ञेकडे मात्र त्यांनीं दुर्लक्ष केलें आहे. सर्वश्रेष्ठ अशा व्यक्तींनींहि कसोटीची वेळ आली असतां त्याला दगा दिला: यामुळें आतां सर्वसामान्य जनता न्यायाचाच तिरस्कार करूं लागली आहे. याचा परिणाम असा झाला कीं, जेव्हां निवड करण्याची सत्ता लोकांच्या हातीं आली, तेव्हां त्यांनीं न्याय व सदयता यांच्यावर श्रद्धा असणाऱ्यांना दूर लोटलें आणि खुनी, राजद्रोही आणि दरवडेखोर अशांना जवळ केलें. जीवनाच्या प्रभूपेक्षां खुनी बरा, शांततेची प्रस्थापना करणारापेक्षां राजद्रोह माजविणारा बरा आणि जगांत न्यायाची संस्थापना करणारापेक्षां दरवडेखोर बरा, असें त्यांना वाटूं लागलें आहे.

वर मी संपत्तीच्या अभिसरणास समुद्राकडे वहात जाणाऱ्या प्रवाहाची उपमा दिली आहे. विशिष्ट दृष्टीनें विचार केल्यास ती एकदेशी नसून पूर्णोपमा असल्याचें आढळून येईल. सर्वसामान्य अर्थशास्त्रज्ञांना असें वाटतें की, ज्यांना जो माल हवा असेल तो त्यांना मिळावा, जेथें मागणी असेल तेथें पुरवठा व्हावा, हा नियम शोधून काढल्यामुळें आपण मोठेच शहाणे ठरलों आहों. यापुढें जाऊन ते असेंहि जाहीर करतात कीं, मागणी आणि पुरवठ्याच्या या नियमाला प्रतिबंध करणें मानवी कायद्याला शक्य नाही. पण पाण्याच्या प्रवाहासंबंधींहि सृष्टीचा असाच निश्चित नियम आहे. जिकडे त्याची गरज असेल, म्हणजे जिकडे उतार असेल तिकडे तें वहात जातें. नद्यांचे किंवा ढगांचे जे नियम आहेत, त्यांना मानवी इच्छा प्रतिबंध करूं शकत नाही, पण त्यांच्या क्रियेचे प्रकार बदलून त्यांचा उपयोग करून घेणें, दूरदृष्टी मनुष्यास शक्य असतें. नदीचा प्रवाह मंगलदायक ठरणार अथवा शापदायक ठरणार हें मनुष्याच्या प्रयत्नावर आणि त्याचा उपयोग करून घेण्याच्या त्याच्या योजकतेवर अवलंबून आहे. जेथील हवा उत्कृष्ट आहे व जमीन सुपीक आहे असे जगांतील अनेक विस्तृत प्रदेश नद्यांच्या प्रकोपामुळें शतकानुशतकें ओसाड पडलेले आहेत. केवळ ओसाडच नव्हेत तर ते रोगग्रस्तहि बनलेले आहेत. जो प्रवाह योग्य मार्ग लावून दिला असतां, अनेक शेतांतील जमीन भिजवून ती सुपीक करू शकला असता, ज्याच्या योगानें हवा शुद्ध बनली असती, मनुष्यांना व पशूंना अन्न मिळालें असतें व ज्यानें आपल्या पृष्ठभागावरून त्याचा मालहि वाहून नेला असता तोच प्रवाह मैदानांत घुसला आहे आणि त्यानें सर्व हवा रोगट बनवलेली आहे. त्याच्यावरून वाहाणारा वारा रोगजंतूंचा फैलाव करीत आहे आणि त्याच्याचमुळें अन्नाचा दुष्काळ पडला आहे. अशाच प्रकारें संपत्तीचा प्रवाह "जिकडे गरज असेल तिकडे जात असतो. मागणी असेल तेथें पुरवठा होतो." मनुष्यकृत कायद्यांनीं त्याला अडवितां येत नाहीं, त्याला फक्त योग्य दिशा लावून देतां येते; पण एखादा कालवा काढून किंवा बांध घालून हीच गोष्ट इतक्या चांगल्या प्रकारें करतां येईल कीं, त्या प्रवाहांतून जीवनजलाचा लाभ होऊं शकेल. ज्ञानपूर्ण हातांनीं

निर्माण केलेली संपत्ति ती हीच होय. याच्या उलट, आपल्याच अनिर्बंध मार्गानें त्या प्रवाहाला वाहूं दिल्यास, तो राष्ट्राचा अत्यंत निष्ठुरपणें घात करील. ( इतिहासांत असें अनेक वेळां घडलें आहे ). अशा प्रकारें सर्व आपत्तींच्या मुळाचें पोषण करणारा मृत्यूचा विषप्रवाहच तो बनेल.

संपत्तीच्या प्रवाहाचें नियमन करून तिची योग्य विभागणी करणाऱ्या बंधनांची आवश्यकता, सामान्य अर्थशास्त्रज्ञ आपल्या शास्त्राची व्याख्या बनवीत असता विसरून जात असतात, हें एक आश्चर्यच आहे. " श्रीमंत बनण्याचें शास्त्र " असें संक्षिप्त नाव ते आपल्या शास्त्रास देत असतात; पण श्रीमंत बनण्याच्या अनेक विद्या व कला आहेत. मोठी मालमत्ता असणाऱ्यांवर विषप्रयोग करण्याची एक विद्या बऱ्याच मोठ्या प्रमाणावर मध्ययुगांत प्रचलित होती, आणि गरिबांच्या अन्नांत भेसळ करून श्रीमंत बनण्याची एक कला आधुनिक काळांत बरीच भरभराटीस आली आहे. लोकांना दहशत दाखवून पैसे लुबाडण्याचें डोंगरी लोकांचें सन्मान्य प्राचीन शास्त्र, पतीवर माल आणण्याचें त्याहून थोडें कमी सन्मान्य असें आधुनिक शास्त्र आणि आधुनिक कालातील मोटमोठ्या सर्व धंद्यापासून खिसे कापण्याच्या कौशल्यपूर्ण कलेपर्यंत सर्वत्र रूढ असलेल्या द्रव्यार्जनाच्या विविध कला, या सर्वांचा 'श्रीमंत बनण्याची शास्त्रें किंवा कला' या स्थूल वर्गात अंतर्भाव होऊं शकतो.

सामान्य अर्थशास्त्रज्ञ आपल्याच शास्त्राला श्रीमंत बनण्याचें एकमेव शास्त्र असें नाव देतात. यावरून त्याचें वैशिष्ट्य दर्शविणाऱ्या काही विशेष कल्पना त्यांच्या मनांत असल्या पाहिजेत हें उघड आहे. " कायदेशीर किंवा न्याय्य मार्गांनी श्रीमंत बनण्याचें शास्त्र" असा त्याचा आशय असावा असें म्हटलें, तर त्यांत त्याच्या हेतूचा विपर्यास होणार नाहीं अशी मला आशा आहे. या व्याख्येंत " कायदेशीर " हा शब्द ठेवायचा, कीं " न्याय्य " हा शब्द ठेवायचा याचा निर्णय होणें अवश्य आहे. कारण मुळींच न्याय्य नसणारे कांहीं व्यवहारहि कित्येक राष्ट्रात, अथवा कित्येक राज्यकर्त्यांच्या अमदानींत, किंवा कांही वकिलांच्या साहाय्यानें " कायदेशीर " ठरूं शकतात. म्हणून, जर आपल्या व्याख्येंत अखेरीस " न्याय्य " हा एकच शब्द आपण ठेविला, तर या एका छोट्या शब्दाच्या भरीनें आमच्या

शास्त्राच्या 'व्याकरणां'त मोठाच फरक पडणार आहे. कारण, मग आपणांस शास्त्रीय मार्गानें श्रीमंत व्हावयाचें असेल, तर आपण तसें न्याय्य मार्गानेंच बनलें पाहिजे असें सिद्ध होईल. अर्थात् न्याय्य म्हणजे काय, याचें ज्ञान करून घेणें आपणांस अवश्य होईल. अशा प्रकारें आपलें शास्त्र सामान्य शहाणपणावर अवलंबून न राहतां न्याय-शास्त्रांतील ( Jurisprudence ) शहाणपणावर तें अवलंबून राहील. हें न्यायशास्त्र म्हणजे मानवी न्यायशास्त्र नव्हे, तर परमेश्वरी न्यायशास्त्र असें समजलें पाहिजे. हें शहाणपण म्हणजे सामान्यप्रतीचें शहाणपण नसून न्यायसूर्याच्या प्रकाशांत वावरणारें श्रेष्ठ प्रतीचें स्वर्गीय शहाणपण होय. म्हणूनच गरुडाच्या डोळ्याप्रमाणें आकाशांत उंच विराजमान होणाऱ्या तारकांची उपमा अशा ज्ञानी आत्म्यांना डँटेनें दिलेली आहे. जीवनांतील प्रकाश आणि अंधकार याच्यांतील विवेक तेच करूं शकतात, अथवा सर्व मानववंशाचे ते जणूं काय तेजस्वी नेत्रच आहेत, आणि न्यायाला सामर्थ्य देऊन त्याचा प्रभाव गाजविणारे महात्मे, हेच या आकाशसंचारी द्विजश्रेष्ठाचे पंख होत. ( जगाला आराम देणारे पख असें त्याचेंच वर्णन इतरत्र त्यानें केलें आहे ).

आकाशांतील आपला संचार चालू असता, ते पुढील अक्षरांची आकृति तेथें काढीत असतात. "पृथ्वीवरील न्यायनिर्णय करणारांनो, दक्षतेनें न्यायाची भक्ति करा." ( केवळ भक्ति नव्हे, तर दक्षतेची भक्ति म्हणजे विवेकपूर्वक सारासारनिर्णय करण्याची दक्षता, आणि इतर सर्व गोष्टींपेक्षां न्यायालाच अग्रस्थान देण्याची बुद्धि ). पृथ्वीवरील न्यायनिर्णय करण्याचें हें कार्य केवळ न्यायाधीशाना किंवा राज्यकर्त्यांनाच करावें लागतें असें नाहीं. प्रत्येकाला आपल्या शक्तीप्रमाणें व अधिकाराप्रमाणें हा निर्णय करावा लागत असतो. पण ज्यांनीं ख्रिस्ती धर्माच्या आज्ञेनुसार संन्यासदीक्षा घेतली आहे ( म्हणजे लोकसेवेची अथवा लोकांच्या क्लेशनिवारणाची दीक्षा घेतली आहे ) आणि राजे बनल्यामुळें ज्यांच्याकडे न्यायसंशोधनाचें व लोकनेतृत्वाचें कार्य आलें आहे, त्यांनीहि या सत्याकडे दुर्लक्ष करावें ही दुःखाची गोष्ट होय. अनधिकारी व असमर्थ व्यक्ती, साधू आणि राजे म्हणून मिरवूं लागल्यामुळें या पदव्यांचा खरा अर्थ लोक विसरून गेले

आहेत. तसेंच पावित्र्य आणि प्रभुत्व यांचें रहस्य भूतदया आणि न्यायनिर्णय यांत नसून, मोठमोठे झगे घालणें किंवा उंची मुकुट धारण करणें, यांतच आहे अशी कल्पना अनेक वर्षे रूढ झाल्यामुळेंहि असा परिणाम झाला असावा. वस्तुतः लोकांचा उद्धार करण्याची शक्ति हेंच खरें पावित्र्य आणि लोकांवर राज्य करण्याचें सामर्थ्य हेंच खरें प्रभुत्व होय. अशा सामर्थ्याच्या अवहेलनेंतूनच अन्यायाचा उद्भव होत असतो आणि पाण्यांतील मासे अथवा सरपटणारे प्राणी यांच्यांत आढळणारा मात्स्यन्याय मानव समाजांत दिसूं लागतो.

अर्थात् ज्याप्रमाणें पूर्ण सत्य कोणासहि समजूं शकत नाहीं, त्याचप्रमाणें पूर्ण न्याय हाहि कोणास समजूं शकत नाही. तथापि सत्याची आशा व आकांक्षा बाळगणारे ते सत्यनिष्ठ, व ती न बाळगणारे ते असत्यनिष्ठ, असें आपण समजतों. त्याचप्रमाणें न्यायाची आकांक्षा आणि आशा बाळगणें हेंच पुण्यशील मनुष्याचें वैशिष्ट्य असतें. तसेंच पूर्ण न्यायाची प्राप्ति होणें शक्य नसलें तरी सर्व व्यवहारास अवश्य तितक्या न्यायाची प्राप्ति होणें शक्य असतें, मात्र न्यायप्राप्ति हें आपलें ध्येय आपण बनविलें पाहिजे.

म्हणून आतां आपणांस श्रमाचा न्याय्य मोबदला म्हणजे काय, या संबंधींचे नियम शोधून काढिले पाहिजेत. हे नियम हाच न्यायशास्त्राचा मोठा आधार आहे.

पैशानें होणाऱ्या व्यवहारांत कोणत्या मूलभूत कल्पना गृहीत धरलेल्या असतात तें मी मागील निबंधांत विशद केलें आहे. त्याच दृष्टीनें पैशाच्या व्यवहारांतील न्याय म्हणजे काय, व तो कसा प्राप्त होईल, हें योग्यप्रकारें ठरवितां येईल.

तेथें असें म्हटलें होतें कीं, एकाद्याला द्रव्य देणें म्हणजे त्यानें आज आपणासाठीं ज्या प्रकारचें काम जितका वेळ केलें असेल, तितका वेळ त्याच प्रकारचें काम त्यास लागेल तेव्हां इतरांकडून करवून घेतां येईल, अशी व्यवस्था करणेंच होय.

त्यानें आपणासाठीं केलेल्या कामाहून कमी काम 'त्याला मिळवून देण्याचें वचन आपण दिलें, तर त्याच्या न्याय्य मोबदल्यापेक्षां आपण

त्यास कमी मोबदला दिला असें होईल आणि त्याहून अधिक काम देण्याचें वचन आपण त्यास दिलें, तर वाजवीपेक्षां अधिक मोबदला त्यास दिला असें होईल. व्यवहारांत ही गोष्ट मागणी व पुरवठा यांच्या नियमानुसार ठरत असते. जेव्हां एकादें काम करण्यास दोन माणसें तयार असतात आणि एकाच माणसाला त्या कामाची जरूरी असते, तेव्हां ती दोन मनुष्यें आपापसांतील स्पर्धेनें त्या कामाचा भाव उतरवितात, व ज्याला तें काम मिळतें त्याला वाजवीपेक्षां कमी मोबदला मिळतो. याच्या उलट, जेव्हां दोन मनुष्यांना एकादें काम करवून घेण्याची गरज असते, आणि तें काम करण्यास एकच मनुष्य तयार असतो, तेव्हां ज्या दोघांस तें काम करवून घेण्याची गरज असते, ते आपापसांतील स्पर्धेनें त्या कामाचा भाव वाढवितात, आणि कामकऱ्याला वाजवीपेक्षां अधिक मोबदला मिळतो.

या दोनहि प्रकारच्या अन्यायांचा विचार पुढें क्रमशः करण्यात येईल. पण तत्पूर्वी या दोन्ही टोकांच्या दरम्यान असणाऱ्या वाजवी अथवा न्याय्य मोबदल्याचें मध्यवर्ति तत्त्व वाचकांनी स्पष्टपणें समजून घ्यावें अशी माझी इच्छा आहे.

आपण एकाद्या मनुष्यास एकादें काम करावयास सांगितलें, तर तें करण्याबद्दल तो मोबदला मागेल, अथवा तें तो मोफतहि करील. मोफत केलेल्या कामाचा प्रश्न येथें उपस्थितच होत नाहीं, कारण तो स्नेहाचा प्रश्न आहे, सौद्याचा नव्हे. पण त्यानें त्याबद्दल मोबदला मागितला आणि त्याच्याशीं शुद्ध न्यायीपणानें वागण्याची आपली इच्छा असली, तर तो आपल्या कामी जितका काळ, जितकी शक्ति आणि जितकें कौशल्य वेंचण्यास तयार असेल, तितका काळ, तितकी शक्ति आणि तितकें कौशल्य आपणहि त्याच्या पदरांत टाकणें हाच न्याय होय, हें उघड आहे. एकाद्या मनुष्यानें आपणासाठीं एक तासभर काम केलें आणि त्याचा मोबदला म्हणून आपण त्याच्यासाठीं अर्धाच तास काम करण्याचें वचन दिलें, तर त्याच्यापासून आपण अन्याय्य फायदा उपटला असें होईल. याच्या उलट आपण जर त्याच्या मोबदला दीड तास काम करण्याचें वचन दिलें, तर त्यानें अन्याय्य फायदा

घेतला असें होईल. तंतोतंत समान मोबदला हाच न्याय होय. मालक व मजूर यांच्या सामाजिक स्थानांचा विचार लक्षांत घेऊन मोबदल्याचा निर्णय दिला तर तो मालकांस यांहून अधिक अनुकूल होणार नाहीं. एकाद्यानें मला आज दिलेल्या एक पौंड पावाबद्दल त्यास तो गरीब म्हणून उद्यां अर्धाच पौंड मीं परत द्यावा असें सिद्ध करण्यास कोणतेंहि न्याय्य कारण खचित दाखवितां येणार नाहीं. अथवा एकादा मनुष्य अशिक्षित आहे म्हणून त्यानें माझ्या कामीं जितकें ज्ञान व कौशल्य वेंचिलें असेल, त्याहून कमी ज्ञानाचा व कौशल्याचा उपयोग मीं त्याच्यासाठीं करावा असें सिद्ध करण्यासहि कोणतेंच न्याय्य कारण असूं शकणार नाहीं. अखेरीस कदाचित् असेंच दिसून येईल कीं, त्यानें दिलेल्यापेक्षां थोडासा अधिक मोबदला मींच त्यास द्यावा, हेंच इष्ट व उदारपणाचें आहे. पण तूर्त आपण केवळ न्यायदानाच्या प्रश्नाचाच विचार करीत असल्यानें ‘पूर्ण व तंतोतंत समान विनिमय’ हेंच या बाबतींत सूत्र बनवितां येईल. न्याय्य मोबदल्याच्या या साध्या मूलभूत कल्पनेला एकाच कारणामुळें संकीर्णता प्राप्त होत असते. तें कारण असे कीं, ज्याप्रमाणें बी पेरलें असतां त्याला फळ येतें, त्याचप्रमाणें योग्य दिशेनें श्रम केल्यास त्यालाहि फळ प्राप्त होत असतें. (यालाच वृद्धि किंवा व्याज म्हणतात.) म्हणून जो प्रथम श्रम करतो त्याला त्याचा मोबदला कांहीं काळानें मिळावयाचा असल्यास या वृद्धीचा विचार करून त्यांत कांहीं भर टाकण्यांत आली पाहिजे. आज केलेल्या श्रमाचा मोबदला वर्षाअखेरीस अथवा विशिष्ट मुदतीनंतर मिळावयाचा असेल तर त्या गोष्टीचा ढोबळमानानें हिशेब करतां येईल. परतु पैशांत मोबदला दिल्यास त्यांत कालावधीच्या प्रश्नाचा विचार येत नाहीं. (ज्याला पैसा मिळाला असेल, त्यास तो आजच किंवा पुढें केव्हांहि खर्च करण्याचें पूर्ण स्वातंत्र्य असतें.) सामान्यतः आपणांस असें गृहीत धरतां येईल कीं, जो मनुष्य दुसऱ्याचें काम आगाऊ करतो व कालावधीनें मोबदला घेतो, त्याला त्याबद्दल कांहींतरी न्यायाच्या दृष्टीनें अधिक मिळालें पाहिजे. म्हणून या बाबतींतील नमुनेदार व्यवहार पुढीलप्रमाणें असावा असें म्हणतां येईल. माझ्यासाठीं तुम्ही आज एक तास

काम केलें, तर तुम्ही मागाल तेव्हां तुमच्यासाठीं एक तास पांच मिनिटें काम करण्यास मीं तयार असावें. तसेंच तुम्ही आज मला एक पौंड पाव दिला तर तुम्ही मागाल तेव्हा मीं सतरा औंस पाव द्यावा; इत्यादी. वाचकांनीं इतकेंच लक्षांत घ्यावयाचें कीं, कोणत्याहि कामाबद्दल जो मोबदला द्यावयाचा, त्यामुळें दिलेल्या कामाइतकें तरी काम मोबदला घेणाराच्या पदरांत पडलें पाहिजे.

तेव्हां मजुरीचे योग्य अथवा न्याय्य दर यांची तात्त्विक व्याख्या अशी कीं, मजुरानें जेवढे श्रम मालकाला दिले असतील, तेवढे श्रम तरी त्याला त्या पैशानें केव्हांहि विकत घेतां आले पाहिजेत; थोडेसे अधिकच घेतां यावेत पण केव्हांहि कमी मिळूं नयेत. तसेंच कामाचा हा न्याय्य मोबदला तें काम करण्यास तयार असणाऱ्या लोकांच्या संख्येवर अवलंबून नसावा. मला माझ्या घोड्याला एक नाल बसवावयाचा आहे. तो बसविणारे नालबंद वीस असोत कीं वीस हजार आसोत, त्यांच्या संख्येमुळें जो नालबंद तो बसवील त्याच्या कामाच्या न्याय्य मोबदल्यात रतिभरहि फेरबदल होण्याची आवश्यकता नाही. तो बसविण्यास व बनविण्यास त्याला आपल्या आयुष्यांतील दहापंधरा मिनिटें खर्च करावीं लागलीं असतील, अमुक इतकें बाहुबल व कौशल्य वेंचावें लागलें असेल, तर मग त्याचा मोबदला म्हणून माझ्या आयुष्यांतील (किंवा मला देतां येणाऱ्या अशा दुसऱ्या एकाद्या मनुष्याच्या आयुष्यांतील) दहापंधरा मिनिटें, तितकेंच कौशल्य व तितकेंच बाहुबल, हीं त्या नालबंदास जें काम हवें असेल त्या कामासाठीं मीं मिळवून दिलीं पाहिजेत.

कामाच्या न्याय्य मोबदल्याची तात्त्विक उपपत्ति ही अशी आहे. ती व्यवहारास लागू करतांना आणखी एक गोष्ट लक्षांत घ्यावी लागते. ती म्हणजे जेव्हां आपण एकाद्यास कांहीं काम करावयास लावितों, तेव्हां त्या कामाचें स्वरूप विशिष्ट असतें, पण त्याच्या मोबदला त्याला जो पैसा मिळतो त्यामुळें कशाहि प्रकारचें काम विकत घेण्याची सामान्य सत्ता त्यास मिळत असते. देशांतील चलनी नाणें म्हणजे, कोणत्याहि प्रकारचें काम मिळवून देणारी अशी त्या राष्ट्राच्या नांवानें काढिलेली एक हुंडीच असते. आपल्या तात्कालिक गरजा ताबडतोब भागविण्यास सामान्यत्वानें

उपयोगी पडण्याचा हा गुण पैशामध्यें असतो. त्यामुळें कोणत्याहि विशिष्ट प्रकारच्या कामापेक्षां पैशाला अधिक महत्त्व मिळत असतें. ही हुंडी वाटेल त्या प्रकारच्या कामावर सामान्यत्वें चालणारी असल्यामुळें विशिष्ट प्रकारच्या कोणत्याहि कामापेक्षां ती थोड्या कमी किंमतीची असली तरीहि ती स्वीकारण्यास लोक नेहमी तयार असतात. आपणास वाटेल त्या प्रकारचें अर्ध्या तासाचें किंवा त्याहूनहि कमी काम मिळविण्याची सत्ता मिळत असल्यास, आपले एक तासाचें काम देण्यास कोणताहि कारागीर सहज तयार होईल. या अनिश्चितीमुळें आणि निरनिराळ्या प्रकारच्या कौशल्याची किंमत पैशात ठरविणें बरेंच अवघड असल्यामुळें कोणत्याहि विशिष्ट प्रकारच्या कामाचा चलनी नाण्यांत मोबदला ( ढोबळ प्रमाणांत ) ठरविण्याचा प्रश्न फारच संकीर्ण बनत असतो. पण त्यामुळें विनिमयाचें हें तत्त्व बाधित होऊं शकत नाही. कामाचें मूल्य ठरविणें हें कठिण असलें तरीहि त्याला मूल्य आहे हें निश्चित. अनेक प्रकारचीं द्रव्यें एकत्र मिसळली असतां त्यापैकी प्रत्येकाचें विशिष्टगुरुत्व पृथक्पणें मापणें कठिण असलें तरी त्यांतील प्रत्येकाचें निश्चित व खरें असें विशिष्टगुरुत्व असतेंच; त्याचप्रमाणें प्रत्येक कामाचें निश्चित व वास्तविक असें मूल्यहि असतेंच; मग तें शोधून काढणें कितीहि कठिण असो. शिवाय प्रचलित अडाणी अर्थशास्त्रांतील मागणी-पुरवठ्याच्या नियमानुसार ठरणाऱ्या किमान व कमाल मूल्याचा निर्णय करणें, हें जितकें कठिण अथवा अनिश्चित असतें, तितकें तरी हें खास कठिण नाहीं. आपण दिलेल्या किंमतीपेक्षां विक्रेत्याने कमी किंमत घेतलीच नसती, असें निश्चितपणें ग्राहकास वाटावें, अथवा आपणांस मिळालेल्या किंमतीपेक्षां ग्राहकानें अधिक दिलीच नसती अशी खात्री विक्रेत्यास वाटावी, अशा प्रकारचे साधे सौदे फारच थोडे असतात. तरीहि पुष्कळ वेळा लोक तशी समजूत करून घेऊन समाधान मानीत असतात. या बाबतीत कांटेतोल ज्ञान शक्य नाहीं म्हणून दुसऱ्या पक्षाचें अधिकांत अधिक नुकसान अथवा त्यास जास्तींत जास्त त्रास होईल असा प्रयत्न करण्याचें लोक सोडीत नाहींत. तसेंच जास्तींत जास्त स्वस्ताईनें माल खरेदी करावा व जास्तींत जास्त महागाईनें तो विकावा, हें तत्त्व शास्त्रीय म्हणून स्वीकारण्यासहि ते मागेंपुढें पहात

नाहींत. मात्र जास्तीत जास्त स्वस्त व जास्तीत जास्त महाग म्हणजे काय हें त्यांस बरोबर सांगता येत नाही. अशाच प्रकारें जो न्यायी मनुष्य आहे, तो असें ठरवितो की, आपण न्याय्य किंमत दिली पाहिजे आणि या न्याय्य किंमतीच्या बरोबर मर्यादा जरी त्यास आंखतां आल्या नाहीत, तरीहि शक्य तों त्या मर्यादांचें अतिक्रमण आपणाकडून घडूं नये असा प्रयत्न तो करीत असतो.

या प्रश्नाचें जवळजवळ बरोबर असें व्यावहारिक उत्तर त्यास देतां येतें. गरजू मनुष्य किती थोडा मोबदला घेऊन काम करण्यास तयार होईल, याचें शास्त्रीय निदान करण्यापेक्षा त्याच्या कामाबद्दल त्यास किती मोबदला मिळणें न्याय्य आहे, याचें शास्त्रीय निदान करणें अधिक सोपें आहे. त्याच्या गरजाचा अंदाज अनुमानधक्क्यानेंच करावा लागतो. परंतु परिस्थितीची मीमांसा करून त्याच्या योग्य मोबदल्याचें निदान करतां येईल. एकादा गोंधळून गेलेला शाळेंतील मुलगा उदाहरण करतांना कोणचें उत्तर जुळतें ते पाहून तें सोडविण्याचा प्रयत्न करतो तसा पहिला प्रकार आहे. याच्या उलट, गणितशास्त्राच्या पद्धतीस अनुसरून शक्य तितकें बरोबर उत्तर काढण्याचा प्रयत्न करावा तसा दुसरा प्रकार आहे.

म्हणून कोणत्याहि कामाच्या विशिष्ट प्रमाणाचा न्याय्य मोबदला आपणांस ठरवितां येतो, अशी कल्पना करून हा न्याय्य अथवा अन्याय्य मोबदला ग्राहकांस अथवा मालकांस अनुकूल असल्यास ( जेव्हां काम करण्यास दोन लोक तयार असतात, व त्याची एकासच गरज असते तेव्हांच असें घडेल ), त्याचे परिणाम काय घडतील, त्याचा प्रथम विचार करूं.

अन्यायी ग्राहक त्या दोघांत चढाओढ लावील व त्यांनीं आपल्या कामास शक्य तितका कमी मोबदला मागावा असा प्रयत्न करील. किमान वेतनावर काम करण्यास तयार होणारा तो मनुष्य न्याय्य वेतनाच्या निम्में वेतन घेऊन काम करण्यास तयार झाला, असें आपण समजूं.

मालक त्यालाच तें काम देईल व दुसऱ्यास देणार नाहीं. याचा पहिला अथवा दृश्यमान परिणाम असा की, त्या दोघांपैकी एक मनुष्य

बेकार बनेल अथवा त्याची उपासमार होऊं लागेल. त्याच्यापैकीं चांगल्या कामगारास न्याय्य मोबदला देण्याचा व्यवहार केला, तरीहि असा परिणाम घडेल व या व्यवहारांतहि तितक्याच निश्चितीनें तो तसा घडतो. ज्या अनेक लेखकांनी माझ्या पहिल्या निबंधांतील युक्तिवाद खोडून काढण्याचा प्रयत्न केला त्यांचें या गोष्टीकडे लक्ष गेलें नाहीं. त्यांनी असें गृहीत धरलें आहे की, अन्याय्य व्यवहार करणारा मालक त्या दोघांनाहि काम देईल, पण न्यायानें व्यवहार करणारा जसा दोघांस कामावर ठेवीत नाहीं, तसाच अन्यायी मालकहि दोघास काम देत नाहीं. त्यांच्या व्यवहारांत प्रथमतः एवढाच फरक घडतो की, न्यायी मनुष्य ज्या एका मनुष्यास काम देतो, त्यास भरपूर मोबदला देतो व अन्यायी मनुष्य एकाच मनुष्यास अपुरा मोबदला देतो.

हा फरक प्रथम घडतो असें मी म्हटलें, कारण हा पहिला अथवा दृश्य फरक एवढाच वास्तविक फरक नव्हे. अन्यायी व्यवहारामुळें त्या कामाच्या योग्य मोबदल्याचा निम्मा भाग मालकाच्या ताब्यांत राहातो. यामुळें तेवढ्याच पैशांत तशाच अन्याय्य दरानें दुसऱ्या एकाद्या कामकऱ्यास दुसऱ्या कामावर लावितां येतें व या सर्वांचा अखेर परिणाम असा होतो कीं, त्याच्याजवळ निम्म्या मजुरीवर काम करणारे दोन मजूर राहातात व दोन बेकार होतात.

याच्या उलट हा व्यवहार न्याय्य रीतीनें घडला असता, तर पहिल्या कामाची सर्व मजुरी तें काम करणारालाच मिळाली असती. अशाप्रकारें मालकाच्या हातीं ज्यादा संपत्ति राहिली नसती व तो दुसऱ्या कामावर दुसऱ्या मनुष्यास लावूं शकला नसता. पण जितक्या प्रमाणांत त्याची ही शक्ति कमी होईल तितक्याच प्रमाणांत ज्याला काम मिळालें त्याची ती शक्ति वाढूं शकेल; म्हणजे त्याला अधिक मिळालेल्या निम्म्या मजुरीमुळें दुसऱ्या एका मनुष्यास काम देण्याच्या कामीं त्या पैशाचा उपयोग त्यास करितां येईल. आतां माझ्या युक्तिवादास प्रतिकूल पण अगदीं संभाव्य अशी कल्पना मी करतों. पहिल्या कामगाराला जरी न्यायानें वागविण्यांत आलें तरी तो आपल्या मजुराशीं अन्यायानेंच वागेल व निम्म्याच पगारावर शक्यतर दुसऱ्यास कामावर ठेवील असें आपण समजूं. याचा अखेर

परिणाम असा होईल कीं, एक मजूर आपल्या मालकाचें काम योग्य मजुरी घेऊन करूं लागेल, दुसरा मजूर पहिल्या मजुराचें काम त्याच्या निम्म्या मजुरीवर करूं लागेल, व उरलेले दोन मजूर पूर्वीप्रमाणें याहि व्यवहारांत बेकार राहतील.

मागें म्हटल्याप्रमाणें दोनहि उदाहरणांत दोघेजण बेकार राहणारच. न्याय्य व अन्याय्य व्यवहारांतील फरक काम मिळणाऱ्या मजुरांच्या संख्येंत दिसून येणार नाहीं, तर त्यांना मिळणारी मजुरी किती मिळत आहे व ती कोणाकडून मिळत आहे, यांत तो फरक दिसून येईल. जो महत्त्वाचा फरक मला वाचकांच्या नजरेस आणावयाचा आहे तो हा कीं, अन्याय्य व्यवहारांत पहिल्याच मालकाच्या कामावर दोन मनुष्यें राबत असतात, आणि न्याय्य व्यवहारांत एक मनुष्य पहिल्या मालकाचें काम करतो, दुसरा त्याच्या कामगाराचें काम करतो आणि अशाप्रकारें समाजांतील निरनिराळ्या थरांत काम देण्याची ही शक्ति विभागली जाते. जेथें न्याय होईल, तेथें ती एकाच्या हातून दुसऱ्याच्या हातीं जाऊं शकते व अन्याय झाला असतां एकाच हातीं सांठून राहाते. म्हणून न्यायाचा या बाबतींत सार्वत्रिक व नित्य परिणाम असा होतो कीं, अनेकांवर गाजवितां येणारी एका व्यक्तीच्या हातची आर्थिक सत्ता कमी होते आणि ती अनेक लोकांत परंपरेनें विभागली जाते. दोनहि उदाहरणांत आर्थिक सत्ता प्रत्यक्ष तितकीच असली, तरी अन्यायामुळें ती सर्व एकाच व्यक्तीच्या हातीं गोळा होते आणि म्हणून त्याला आपल्या भोंवतीं अनेक कामगारांना नाचवितां येतें. याच्या उलट, न्याय्य व्यवहारामुळें त्याला फक्त आपल्या निकटच्या अशा व्यक्तीवरच सत्ता गाजविणें शक्य होतें आणि एकंदर आर्थिक सत्ता त्याच्या नोकरांत व त्यांच्यामार्फत इतरांत विभागून गेल्यानें तिचें सामर्थ्य कमी होतें. निरनिराळ्या मनोवृत्तीच्या लोकांच्या हातीं गेल्यामुळें ती प्रत्येक ठिकाणीं भिन्न स्वरूपांत व्यक्त होते. अशाप्रकारें ती सर्व शक्ति अखेरपर्यंत विभागली जाते.

म्हणून या बाबतींतील न्यायाचा परिणाम तत्काल असा होतो कीं, चैन करण्याची व दुसऱ्यावर सत्ता गाजविण्याची धनिकांची शक्ति कमी होते. मालकवर्गाला अनेक प्रकारच्या लोकांची श्रमशक्ति आपल्याच हिताच्या

कामीं लावितां येत नाहीं, व अनेकांच्या मनांवर आपली इच्छा लादतां येत नाहीं. पण न्याय्य व्यवहारांचे जे दुय्यम परिणाम घडतात, तेहि कमी महत्त्वाचे नसतात. अनेक लोक अपुऱ्या पगारावर जेव्हां एकाच व्यक्तीचे नोकर बनतात तेव्हां त्यांना समाजांतील वरच्या श्रेणींत प्रवेश करून घेणें अत्यंत कठिण बनतें. यामुळें अशा पद्धतीची प्रवृत्ति उन्नतीला प्रतिबंध करणारी असते. पण न्याय्य व पुरेसें वेतन मिळून आर्थिक शक्ति निरनिराळीं कामें करणाऱ्या व निरनिराळ्या दर्जाच्या लोकांत विभागली गेली, म्हणजे खालच्या थरात काम करणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला इच्छा असेल तर आपल्या प्रयत्नानें वरच्या श्रेणींत प्रवेश करण्याची योग्य व पुरेशीं साधनें उपलब्ध होऊं शकतात. अशाप्रकारें न्याय्य पद्धतीमुळें संपत्तीची तात्कालिक शक्ति कमी होते इतकेंच नव्हे, तर दारिद्र्याचे अत्यंत हीन दुष्परिणामहि नाहीसे होतात.

याच जिव्हाळ्याच्या प्रश्नाच्या निर्णयावर कामगारांचें सर्व भवितव्य अखेरीस अवलंबून आहे. त्यांच्या हितसंबंधाला बाध आणणारे इतर अनेक गौण प्रश्न पुष्कळ वेळां पुढें येत असल्याचें दिसतें; पण त्या सर्वांचा उद्भव या एकाच प्रश्नांतून झालेला असतो. उदाहरणार्थ, खालच्या वर्गातील लोकांना आपल्या पगारांपैकीं कितवा हिस्सा कर रूपानें सरकारास द्यावा लागतो, ( मला वाटतें कीं,. हा हिस्सा ३५ टक्के किंवा चाळीस टक्के असावा ) हें त्यांना समजलें म्हणजे त्यांच्यांत मोठी खळबळ उडते. हा कर तेच आपल्या पगारांतून देत असतात असें बाह्यतः वाटतें व हा मोठाच अन्याय आहे असें ते मानितात. पण वस्तुतः हा कर ते कामगार देत नसून त्यांच्या मालकांसच द्यावा लागतो. कामगारांना हा कर द्यावा लागला नसता तर तेवढ्या प्रमाणांत त्यांची मजुरी कमी झाली असती. त्यांच्या आपापसांतील स्पर्धेमुळें जीवनास अत्यंत अवश्य इतक्या मजुरीच्या दरापर्यंत ती खाली आली असती. अशाच प्रकारें धान्यावर जकाती बसविणारे कायदे रद्द व्हावेत, म्हणून खालच्या वर्गातील लोकांनी चळवळ केली; कारण त्यांना वाटत होतें कीं, जर आपणांस रोटी स्वस्त मिळूं लागली तर आपली स्थिति सुधारेल. पण रोटी कायमची स्वस्त मिळूं लागली तर आपल्या मजुरीचे दरहि तेवढ्या प्रमाणांत

कायमचे उतरतील, हें त्यांना कधींच समजलें नाहीं. धान्यावरील जकातीचे कायदे रद्द झाले तें योग्यच झालें, पण त्यामुळें गरिबांवर प्रत्यक्ष जुल्म होत होता म्हणून नव्हे, तर गरिबांची श्रमशक्ति अनुत्पादक धंद्यांत वेंचिली जात असे व त्यामुळें त्यांच्यावर अप्रत्यक्ष जुल्म होत होता तो थांबला, म्हणून तें योग्य झालें. याचप्रमाणें अनवश्यक कर बसविले गेल्यास देशांतील भांडवल नष्ट होतें व अखेरीस कामगाराचेंहि अशा करामुळें नुकसान होतें. पण कामगारांचें भवितव्य मुख्यतः त्यांना मिळणाऱ्या मजुरीचे दर न्याय्य आहेत कीं नाहींत, या प्रश्नावरच अवलंबून असतें. आळस, किरकोळ चुका किंवा गुन्हेगारी, यामुळें ओढवणाऱ्या आपत्ती वगळल्यास त्यांच्या सर्व आपत्तींचा उद्भव परस्परांतील स्पर्धा आणि त्याच्यावर होणारा अन्याय या कारणांतूनच मुख्यतः होत असतो, आणि हीं कारणें एकमेकांवर अवलंबून असतात. एकंदर जगाच्या दृष्टीनें विचार केल्यास अद्यापि लोकसंख्या वाजवीपेक्षां फाजिल झालेली आहे किंवा आणखी कित्येक शतकें ती तशी होऊं शकेल असें वाटत नाहीं. पण दूरदृष्टीच्या व पुरेशा यंत्रसाधनांच्या अभावीं कांहीं विशिष्ट प्रदेशांत फाजिल लोकसंख्या झाल्याचें आर्थिक जीवनांतील तीव्र स्पर्धेमुळें दिसून येतें. या स्थानिक दृष्टीनेंसुद्धा लोकसंख्या फाजिल झाली आहे असें म्हणण्यापेक्षा आपण तिची आजच्या परिस्थितींत सोय लावूं शकत नाहीं, असेंच म्हणणें अधिक बरोबर होईल. या स्पर्धेच्या तीव्रतेचा फायदा घेऊन त्यांची श्रमशक्ति अन्यायानें कमी भावांत विकत घेण्यांत येते. यामुळें त्यांचें व त्यांच्याबरोबर ती विकत घेणारांचेंहि अनहित होत असतें; कारण इतर सर्व प्रकारच्या गुलामगिरीप्रमाणें या प्रकारांतहि जो जुलूम करतो त्याला, ज्यांच्यावर जुल्म होतो त्यांच्यापेक्षांहि, अखेरीस अधिक कष्ट सोसावे लागतात. या बाबतींत पोपच्या काव्यांतील पुढील उत्कृष्ट उद्गारहि वस्तुस्थितीचें यथार्थ वर्णन करण्यास अपुरेच भासतील. पोप म्हणतो:

"हे बिचारे श्रीमंत लोक इतरांबरोबर समत्वबुद्धीनें आपलेंहि अनहित करून घेत असतात हें कबूल करणें भाग आहे. खाणीशीं नित्य खिळून गेल्यामुळें ती खणणारे मजूर जसे गुलाम बनतात, त्याचप्रमाणें त्या

खाणींतून निघणारी संपत्ति इतरांपासून लपवून ठेवणारे मालकहि तितकेच गुलाम बनतात, व दोघांचें भवितव्य सारखेंच होतें. ''

या बाबतींतील न्यायप्रस्थापनेचे जे आनुषंगिक व दूरान्वित परिणाम घडतात, त्याचा विचार मी पुढें करीन. ( तत्पूर्वी मूल्याची व्याख्या करणें आवश्यक आहे ). त्यानंतर अधिक न्याय्य पद्धति किती मर्यादेंत व्यवहारांत आणणें शक्य होईल, त्याचा विचार करावा लागेल आणि अखेरीस बेकार कामगारांचें भवितव्य ठरविण्याच्या वादग्रस्त प्रश्नाकडे वळावें लागेल. तथापि, आतापर्यंत केलेल्या विवेचनावरून आर्थिक सत्तेविरुद्ध मीं केलेल्या युक्तिवादांचा समाजवादाशीं कांहीं संबंध आहे, अशी भीति वाचकांस वाटूं नये, म्हणून माझ्या मनांतील एकदोन महत्त्वाचे मुद्दे नेमक्या शब्दांत येथें मी मांडूं इच्छितों.

लष्कर आणि आरमार यासारख्या ज्या खात्यांत मीं सांगितलेल्या तत्त्वानुसार कामाचा मोबदला देण्यांत येत असतो, त्यांतील लोकांत समाजवादाचा प्रसार अधिक झालेला आहे कीं माझ्या विरोधकांच्या तत्त्वाप्रमाणें जेथें मजुरी मिळत असते, अशा कारखान्यांतील कामगारांत त्या तत्त्वाचा प्रसार अधिक झालेला आहे, याचा शोध करून तो जाहीर करण्याचें काम मी माझ्या विरोधकावरच सोपवितों. या बाबतींत त्याचा कांहींहि निर्णय झाला तरी माझ्यापुरतें एवढें सांगितलें म्हणजे पुरें आहे की, माझ्या ग्रंथांत अथपासून इतिपर्यंत जर कोणत्या एका मुद्यावर सर्वांत अधिक भर देण्यांत आला असेल, तर तो समानता प्रस्थापित करण्याची अशक्यता हाच मुद्दा होय. समाजांत काहीं व्यक्ती इतरांहून नेहमीच श्रेष्ठ असतात, व कित्येक वेळा एकच व्यक्ति इतर सर्व व्यक्तीहून श्रेष्ठ असूं शकते, हें दाखवून देणें हा माझा नित्य उद्देश असतो. तसेंच अशा व्यक्तींना अथवा व्यक्तीला इतरांना मार्ग दाखवून देण्याची, त्यांचें नेतृत्व करण्याची किंवा कित्येक प्रसंगीं आपल्या प्रगल्भ ज्ञानानुसार व निष्ठेनुसार इतरांवर सक्ती करण्याचीहि सत्ता देणें इष्ट आहे, असें मीं दाखविलें आहे. तीन वर्षांपूर्वी मँचेस्टरमध्यें बोलत असतां मी जे शब्द योजिले त्यांत अर्थशास्त्रा-संबंधींचीं माझीं सर्व तत्त्वें अंतर्भूत झालीं आहेत. तेथें " तलवार गाजविणाऱ्या सैनिकांप्रमाणें नांगर चालविणारे सैनिक '' असे शब्द मीं

योजिले होते. याचप्रमाणें 'मॉडर्न पेंटर्स' या ग्रंथाच्या शेवटच्या विभागांत मीं एक वाक्य घातलें आहे. त्यांत माझ्या सर्व तत्त्वांचा सूत्ररूपानें समावेश झाला आहे. तें वाक्य असें: " सर्व क्षेत्रांत नियंत्रण आणि सत्कार्य हीं जीवनदायी तत्त्वें आहेत आणि अनियंत्रण व स्पर्धा हीं मारक तत्त्वें आहेत."

माझ्या या तत्त्वामुळें मालमत्तेच्या शाश्वतीला कितपत धोका येईल, या शंकेसंबंधीं मी एवढेंच सांगतों कीं, ही शाश्वति कमी करावी असा माझा हेतु नसून ती शाश्वति अधिक वाढावी, हेंच या निबंधांचें रहस्य आहे असें अखेरीस दिसून येईल. फार पूर्वीपासून हें तत्त्व शाबीत झालेलें आहे की, श्रीमंतांच्या मालमत्तेवर आघात करण्याचा गरिबांना हक्क नाहीं. त्याप्रमाणें गरिबांच्या मालमत्तेवर आघात करण्याचा हक्कहि श्रीमंतांना नाहीं असें मला शाबीत करावयाचें आहे.

तथापि ज्या आर्थिक पद्धतीचें वर्णन मी करीत आहें, ती प्रस्थापित झाल्यास त्यांची आनुवंशिक अप्रत्यक्ष शक्ति कमी झाली नाहीं, तरी संपत्तीरूप सुखदेवतेच्या अंगीं जी शक्ति आज प्रत्यक्ष दिसत आहे ती कमी होईल. तसेंच कष्टजीवि वर्गाच्या जीवनावर प्रभुत्व गाजविणाऱ्या भांडवलाचें सामर्थ्यहि कमी होईल, हें मी नाकारीत नाहीं, उलट मोठ्या आनंदानें तें मी कबूल करतों. कारण संपत्तीच्या अंगीं जी आकर्षणशक्ति आज आली आहे व तिला जी सत्ता प्राप्त झाली आहे, तिच्यामुळें मनुष्याची विवेक-शक्ति भ्रष्ट होत आहे असें मला दिसतें. मागील निबंधांत मीं म्हटलें कीं, प्रचलित अर्थशास्त्रांतील सामान्य तत्त्वें शास्त्रीय म्हणून मान्य करण्यामुळें मानवबुद्धीला जें लांछन प्राप्त झालें आहे, त्यास इतिहासांत दाखला सांपडूं शकत नाहीं. असें जें मी म्हणतों त्याला अनेक कारणें आहेत, पण त्यांतील एक प्रमुख कारण थोडक्या शब्दांत पुढीलप्रमाणें सांगतां येईल. आपण अंगिकारिलेल्या धर्मांतील आद्य तत्त्वांना पद्धतशीर धाब्यावर बसविण्याचें यासारखें दुसरें उदाहरण मला कोणत्याहि राष्ट्राच्या इतिहासांत आढळलें नाहीं. आपण ( तोंडानें ) ज्या ग्रंथांना परमेश्वरकृत असें म्हणतों त्यांत धनप्रेम हें सर्व आपत्तींचें मूळ आहे अशा शब्दांनीं या तत्त्वांचा निषेध केला आहे. एवढेंच नव्हे, तर धनाची पूजा करणें हें परमेश्वराला

अप्रिय असून परमेश्वराच्या सेवेशी तें पूर्णपणें विसंगत व अगदी विरोधी आहे, अशी हे ग्रंथ घोषणा करतात. तसेंच जेथें जेथें केवळ संपत्तीचा किंवा केवळ दारिद्र्याचा उल्लेख त्यांनीं केला आहे, तेथें तेथें त्यांनी श्रीमंतांना शाप आणि गरिबांना आशीर्वादच दिलेला आहे. असें असूनहि आम्ही मात्र ' श्रीमंत होण्याचें शास्त्र ' शोधून काढणें, हाच राष्ट्रीय वैभव प्राप्त करण्याचा सर्वांत नजिकचा मार्ग आहे असें समजतों !

" अंतिम न्यायदानाच्या दिवशी मानवांचे सधन आणि निर्धन असे दोन वर्ग परमेश्वर करील, तेव्हां नास्तिकांचा अंतर्भाव पहिल्या वर्गांत व ईशभक्तांचा दुसऱ्या वर्गांत करण्यांत येईल "—डँटे.



## निबंध ४ था

# मूल्यनिदान

कामकऱ्यास त्यानें केलेल्या कामाइतकेंच जवळजवळ काम स्वतःसाठीं पुढें केव्हांतरी मिळवितां येईल, इतके पैसे देणें हाच त्याच्या कामाचा न्याय्य मोबदला होय, असें आपण मागील निबंधांत ठरविलें. आतां ही समानता प्राप्त करण्याच्या साधनांचा विचार आपणांस करावयाचा आहे. या प्रश्नांत 'मूल्य,' 'संपत्ति,' 'बाजारभाव' आणि 'उत्पादन' या सर्वांच्या व्याख्या अंतर्भूत होतात. यांपैकीं कशाचीहि व्याख्या लोकांस समजेल अशा तऱ्हेनें अद्यापि करण्यांत आलेली नाहीं. तथापि या सर्वांत अगदीं स्पष्ट असणारा असा 'उत्पादन' हा जो शब्द, त्याचा अगदीं संदिग्ध अर्थानें उपयोग करण्यांत येत असतो. आज त्याच्या अर्थांत जी संदिग्धता निर्माण झाली आहे तिचा विचार विषयप्रतिपादनाच्या दृष्टीनें प्रथम करणें सोयीचें आहे.

आपल्या पुस्तकांतील ‘ भांडवल ’ या प्रकरणांत जॉन स्टुअर्ट मिल्लनें एका लोखंडी मालाच्या कारखानदाराचे उदाहरण घेतलें आहे. आपल्या कारखान्यांत मिळालेल्या नफ्यांतील कांहीं भाग सोन्याचांदीचीं भांडीं व जडजवाहिर विकत घेण्यासाठीं खर्च करण्याचा त्याचा विचार होता. तो बदलून त्यानें तो पैसा आपल्या कारखान्यांत अधिक कामगार नेमण्यासाठीं खर्च केला. असें केल्यामुळें उत्पादक काम करणाऱ्या कामगारास अधिक अन्न मिळेल, असें मिल्लचें मत आहे.

हा परिच्छेद मीं लिहिला असता तर ‘ सोनाराचें काय होणार ?’ असा प्रश्न मला विचारण्यांत आला असता. तरीहि मी तो येथें उपस्थित करीत नाहीं. ते खरोखरच अनुत्पादक काम करणारे असतील, तर ते नष्ट झाले तरी आपणांस चालेल. याच उताऱ्याच्या दुसऱ्या भागांत त्या लोखंडी व्यापाऱ्यानें आपले इतर बरेच घरगुती नोकर कमी करून त्यांना मिळणारें अन्न उत्पादक कार्यांस लावावें असें ठरविल्याचें दुसरें उदाहरण घेतलें आहे. त्यांचें अन्न तोडल्यामुळें त्या नोकरांवर क्लेशावह परिणाम होईल किंवा नाहीं, हाहि प्रश्न मी विचारांत घेत नाही. पण मी एवढाच प्रश्न गंभीरपणें विचारतों की, लोखंडी माल बनविणें हें काम उत्पादक कां ? आणि सोन्याचांदीचीं भांडीं बनविणें, हें अनुत्पादक का ? पहिला माल तो व्यापारी दुसऱ्यास विकतो आणि दुसऱ्याचा उपभोग तो स्वतः घेतो, एवढ्यानं असा भेद खचित करतां येणार नाहीं. अर्थात् माल निर्माण करण्याचा हेतु त्याचा उपभोग घेणें हा नसून तो विकणें हाच आहे असें असेल, तर मात्र गोष्ट निराळी. ( आणि खरोखर दिवसेंदिवस व्यापाऱ्यांचें हेंच ध्येय बनत आहे, असें मला वाटूं लागलें आहे ). पहिल्या प्रकारांत इतरांना लागणाऱ्या मालाचा पुरवठा तो करीत असतो आणि दुसऱ्या प्रकारांत तो स्वतःच मालाचा उपभोग घेत असतो. पण दोनहि उदाहरणांत कामकरी उत्पादक श्रमच करीत असतात. कारण लोखंडी माल आणि सोन्याचांदीचीं भांडीं हे दोनहि जर मालच असतील, तर दोनहि उदाहरणांत त्यांनीं आपल्या श्रमानें सारख्याच किंमतीचा माल उत्पन्न केला, असें म्हणावें लागेल.

तर मग त्यांच्या कमांत फरक कशामुळें पडतो ? नैतिक दृष्टींनं विचार

करणाऱ्यांस चादीच्या कांट्यापेक्षां पोलादी कांट्याची उत्पत्ति अधिक महत्त्वाची वाटणें शक्य आहे; पण मिल्लच्या मतें तर नैतिक दृष्टीचा अर्थशास्त्राशीं कांहीच संबंध नाही. कांट्याइतके चाकूहि उपयुक्त आहेत आणि पिळे, कोयते व नांगर उपयुक्त आहेत हेंहि आपण कबूल करूं. पण संगिनीविषयी काय म्हणावें ? समजा कीं, आपले घरगुती नोकर आणि सोनार याना कामातून मोकळे करून त्या कारखानदारानें संगिनीच पुष्कळ निर्माण केल्या, व त्या मोठ्या प्रमाणावर विकल्या. तरीहि उत्पादक कामगारांनाच तो काम देत आहे काय ? किंवा मिल्लच्या शब्दांत बोलावयाचें तर ' उपभोगाची नित्य साधनें वाढविण्याचें कामच ' तो देत आहे काय ? संगिनींच्याऐवजी तो बॉबगोळ्यांचाच पुरवठा करूं लागला, तर या स्फोटक व उत्पादक पदार्थांची ( या प्रत्येकास १० पौंड तरी खर्च येतो ) अंतिम उपयुक्तता, त्याचा उपभोग घेण्याच्या स्थलकालावर अवलंबून राहाणार नाही काय ? आणि या स्थलकालांची निवड करतांना ज्या तत्त्वज्ञानाशीं अर्थशास्त्राचा कांहींहि संबंध नाहीं असें मिल्ल म्हणतो, त्या तत्त्वज्ञानाकडेच वळावें लागणार नाही काय ?

मिल्लच्या ग्रंथातील कोठलीहि विसंगति दाखवून देण्यात मला एरव्हीं मोठा विषाद वाटला असता, पण त्यांतील विसंगतीमुळेंच तो ग्रंथ बहुमोल झाला आहे असें मला वाटतें. जीं तत्त्वें त्यानें प्रतिपादिलीं आहेत ती तो नकळत सोडून देतो आणि ज्या नैतिक विचारांशीं आपल्या शास्त्राचा कांहींहि संबंध नाही असें तो जाहीर करतो, तेच नैतिक विचार तो आपल्या विवेचनांत अबुद्धिपुरःसर प्रविष्ट करीत असतो. इतर अर्थशास्त्रज्ञांहून हाच त्याचा सन्माननीय विशेष आहे. म्हणूनच त्या ग्रंथांतील अनेक प्रकरणें यथार्थ व बहुमोल झाली आहेत. पण त्यानें स्वीकारलेल्या गृहीतकृत्यांचे जे निष्कर्ष निघूं शकतात, तेवढ्यांबद्दलच तंटा आहे.

उदाहरणार्थ, सध्या ज्या उताऱ्याचा विचार चालला आहे त्यांतील मूलभूत कल्पना अगदीं बरोबर आहे. म्हणजे समाजाची श्रमशक्ति उपयुक्त वस्तूंच्या निर्मितीस लागली असतां जितक्या लोकांना रोजगार मिळेल तितक्या लोकांना चैनीच्या वस्तू निर्माण करणाऱ्या धंद्यांत तो मिळणार

नाहीं. पण मिल्लनें दिलेलें उदाहरण गैरलागू आहे आणि चौफेर चुकलेलें आहे. एक तर उपयुक्त या शब्दाचा खरा अर्थच त्यानें निश्चित केलेला नाहीं. " एकादी वासना तृप्त करण्याचें अथवा हेतु सिद्ध करण्याचें सामर्थ्य " अशी उपयुक्त वस्तूंची व्याख्या त्यानें केली आहे. ती लोखंडी व चांदीच्या वस्तूंस सारखीच लागू पडते. त्यानें केलेल्या या सदोष व्याख्येव्यतिरिक्त त्याच्या मनांत निर्दोष अशी एक व्याख्या आहे व ती अकल्पितपणें त्याच्या विवेचनांत एकदोन ठिकाणीं व्यक्त झालेली आहे. ( उदाहरणार्थ, पहिल्या पुस्तकाच्या तिसऱ्या प्रकरणांतील पांचव्या परिच्छेदांत जीवन अथवा बल यांचें पोषण करणारा कोणताहि पदार्थ 'Any support to life or strength' असे शब्द त्यानें योजिले आहेत ). ही व्याख्या लोखंडाच्या कांहीं पदार्थांस लागू पडते व कांहींस लागू पडत नाहीं. तशीच ती चांदीच्याहि कांहीं पदार्थांस लागू पडते व कांहींस पडत नाहीं. ती नांगरास लागू पडते पण संगिनीस लागू पडणार नाहीं, आणि ती भोजनाच्या कांट्यास लागू पडली तरी कुसरीच्या बेढब दागिन्यांस लागू पडणार नाहीं.

उपयुक्ततेची निर्दोष व्याख्या बनविली म्हणजे " मूल्य म्हणजे काय ?" हा जो आपला पहिला प्रश्न, त्याचें उत्तर मिळूं शकेल. मूल्यासंबंधी लोकांत रूढ असलेल्या कल्पनांचा प्रथम विचार करूं.

" कोणतेंहि विशेषण न लावितां अर्थशास्त्रांत हा शब्द योजिला जातो तेव्हां त्याचा अर्थ नेहमीं मोबदला असा असतो." ( मिल्ल: पुस्तक ३ रें, प्रकरण १ लें, परिच्छेद ३ रा ). या न्यायानें जर दोन जहाजांना आपल्या सुकाणूंची अदलाबदल करतां येत नसेल, तर अर्थशास्त्रीय दृष्टीनें त्या दोघांच्याहि सुकाणूंना कांहीं 'मूल्य' नाहीं असें सिद्ध होईल.

पण " अर्थशास्त्राचा विषय संपत्ति हा आहे " ( प्राथमिक विचार, पृष्ठ १ लें ).

आणि " संपत्तींत ज्यांना विनिमयमूल्य आहे, अशा सर्व उपयुक्त व इष्ट पदार्थांचा समावेश होतो. " ( प्राथमिक विचार, पृष्ठ १० वें ).

यावरून असें दिसतें कीं, उपयुक्तता आणि इष्टता हे गुण मिल्लच्या मतें विनिमयमूल्याच्या बुडाशीं असतात आणि म्हणून कोणत्याहि

पदार्थाचा संपत्तींत अंतर्भाव करण्यापूर्वी ते त्यांत आहेत किंवा नाहींत याचा निर्णय प्रथम केला पाहिजे.

कोणत्याहि वस्तूची आर्थिक उपयुक्तता केवळ तिच्या आंगच्या गुणांवर अवलंबून नसून तिचा उपयोग करूं इच्छिणारे आणि करूं शकणारे किती लोक आहेत, त्यावरहि अवलंबून असते. जर कोणासहि घोड्यावर बसतां येत नसेल तर घोडा अनुपयुक्त व म्हणून अविक्रेय ठरेल. त्याचप्रमाणें कोणासहि चालवितां येत नसेल तर तलवार व कोणासहि खातां येत नसेल तर खाण्याचें मांस याहि वस्तू अनुपयुक्त ठरतील. अशाप्रकारें प्रत्येक जड वस्तूची उपयुक्तता ही त्यास अनुरूप अशा मानवी गुणांवर अवलंबून असते.

त्याचप्रमाणें कोणत्याहि वस्तूची इष्टता किंवा लोकप्रियता ही केवळ तिच्या आंगच्या गुणांवर अवलंबून नसून किती लोकांत तिच्या संबंधींची आवड उत्पन्न करतां येऊं शकेल, त्यावरहि ती अवलंबून असते. एकाद्या दारूच्या बाटलीची लोकप्रियता अधिक आहे कीं एकाद्या कलापूर्ण चित्राची लोकप्रियता अधिक आहे हें आसपास असणाऱ्या लोकांच्या रसिकतेवरून ठरत असतें व त्यावरच त्यांची विक्रेयताहि अवलंबून असते. याचाच अर्थ असा की, कोणत्याहि वस्तूची इष्टता ही तत्सापेक्ष मानवी वृत्तींवर अवलंबून असते. म्हणून अर्थशास्त्र हें संपत्तीचें शास्त्र असल्यामुळें त्यात मानवी वृत्ती आणि वासना अथवा उपभोगक्षमता यांचा विचार करावा लागतो. पण नैतिक विचारांचा अर्थशास्त्राशीं कांहींच संबंध नाही असें मिल्ल म्हणतो, आणि म्हणून मनुष्याची उपभोगक्षमता व त्याच्या वृत्ती यांच्याशीहि नैतिक विचारांचा काहीं संबंध येत नाहीं असें सिद्ध होतें !

मिल्लच्या विधानापासून निघणारा हा निष्कर्ष मला मुळीच पसंत नाही. तेव्हां आता रिकार्डोच्या विधानांकडे वळूं.

" उपयुक्तता ही जरी विनिमयमूल्यास अगदी आवश्यक असली तरी तिच्यायोगें त्याचें मोजमाप होऊं शकत नाहीं."( प्रकरण १ लें, विभाग १ ला). किती प्रमाणांत आवश्यक, रिकार्डोसाहेब ! उपयुक्ततेचे कमीअधिक प्रमाण असूं शकतें. उदाहरणार्थ मांस घेतलें, तर तें कोणीहि खावें इतकें चांगलें

असूं शकेल, अथवा तें कोणासहि खाण्यालायक नाही इतकें वाईटहि असूं शकेल. जी उपयुक्तता विनिमयमूल्यास आवश्यक आहे, पण जी तिचें माप होऊं शकत नाही, तिचें नेमकें प्रमाण कोणचें ? त्या मांसास विनिमयमूल्य प्राप्त होण्यास तें किती चांगलें असलें पाहिजे ? आणि तें किती वाईट असलें, तर त्याला विनिमयमूल्य असणार नाही ? ( लंडनच्या बाजारात याचा निश्चित निर्णय ठरलेला असेल तर किती बरें होईल ? ).

रिकार्डोची ही तत्त्वें व्यवहारास लागू करतांना काही अडचणी उपस्थित होत असल्याचें दिसतें. पण त्यानें दिलेलें उदाहरण त्याच्याच शब्दात पाहूं या. " समजा कीं, समाजाच्या प्राथमिक अवस्थेंत शिकारी मनुष्यास लागणारी धनुर्ष्ये व बाण याची किंमत मच्छिमाऱ्यास लागणाऱ्या साधनांइतकीच आहे. अशा परिस्थितींत शिकाऱ्याला एका दिवसाच्या श्रमानें मिळणारें एक हरिण आणि मच्छिमाऱ्याला एका दिवसाच्या श्रमाने मिळणारा एक मासा, या दोहोंचें मूल्य तंतोतंत समान असेल. मासे आणि शिकार याचें सापेक्ष मूल्य त्याच्या संपादनासाठी कराव्या लागणाऱ्या श्रमानेंच केवळ नियंत्रित होईल."(रिकार्डोः प्रकरण ३रें,'मूल्य').

अगदी बरोबर ! आणि म्हणून मच्छिमाऱ्यास जर एक स्प्रॅट मासा मिळाला आणि शिकाऱ्याला एक हरिण मिळालें, तर एका स्प्रॅटची किंमत एका हरणाइतकी होईल. पण जर मच्छिमाऱ्यास मुळींच स्प्रॅट पकडतां आला नाही आणि शिकाऱ्याला दोन हरणाची शिकार मिळाली, तर शून्य स्प्रॅटची किंमत दोन हरणाच्या किंमतीइतकी होईल काय ?

छे ! पण रिकार्डोचे पाठिराखे म्हणतील कीं, सरासरी हिशेब करून त्याच्या विधानाचा अर्थ केला पाहिजे. जर एका शिकाऱ्याच्या एका दिवसाच्या श्रमाची सरासरी निष्पत्ति एक हरिण असेल व मच्छिमाऱ्याच्या एका दिवसाच्या कामाची सरासरी निष्पत्ति एक मासा असेल, तर एका हरणाचें मूल्य एका माशाच्या मूल्याइतकें होईल.

कोणत्या जातीचा मासा ? व्हेल कीं व्हाईट बेट ? असा प्रश्न मला विचारतां येईल काय ?

या हेत्वाभासाचा अधिक पाठपुरावा करणें म्हणजे कालाचा अपव्यय आहे. आतां आपण खरी व्याख्या शोधून काढण्याचा प्रयत्न करूं.

इंग्लंडांत पुराणभाषांच्या शिक्षणाला आपण शतकानुशतकें बरेंच महत्त्व देत आलों आहोंत. तेव्हां आमचे सुशिक्षित व्यापारी बराच परिचित असलेला 'व्हॅलोरम' हा शब्द व त्याची प्रथमा विभक्ति 'व्हॅलर', एवढें लॅटिन भाषेचें शाळेंत मिळालेलें ज्ञान ध्यानांत ठेवतील तर फार चांगलें होईल. हा शब्द त्याना परिचित असावयास पाहिजे. 'व्हॅलेअर' धातूपासून झालेल्या 'व्हॅलर' शब्दाचा अर्थ सुदृढ किंवा जोमदार असा आहे. आणि हा शब्द जेव्हा मनुष्यांस लावितात तेव्हां त्याचा अर्थ 'जोमदार जीवनाचा' अथवा 'सुदृढ' असा होतो. आणि तोच एखाद्या वस्तूला लावल्यास 'जीवनात जोम उत्पन्न करणारी' असा त्याचा अर्थ होतो. याच अर्थानें व्हॅलियंट् मॅन म्हणजे जोमदार मनुष्य व व्हॅल्युएबल थिंग् म्हणजे 'जीवनपोषक' अथवा 'बहुमोल वस्तु' असे शब्द योजितां येतात. म्हणून मूल्यवान असणें म्हणजे जीवनाला पोषक असणें असें म्हणतां येतें. एखादी वस्तु मूल्यवान अथवा बहुमोल आहे याचा अर्थ ती आपल्या आंगच्या सर्व गुणांनी जीवनाला पुष्टि देणारी आहे असा होतो. ज्या प्रमाणात ती जीवनाला पोषक नसेल अथवा तिचें तें सामर्थ्य नष्ट झालें असेल, तितक्या प्रमाणात ती कमी मूल्यवान् ठरेल. जितक्या प्रमाणांत ती जीवनाचा क्षय करील, तितक्या प्रमाणांत ती मूल्यहीन अथवा हानिकारक ठरेल.

म्हणून वस्तूचें 'मूल्य' हें तिच्यासंबंधींच्या लोकमतावर आणि तिच्या मोजमापावर अवलंबून नसतें. तुम्हांला तिच्यासबंधीं कांहींहि वाटो, अथवा ती तुम्हांला कितीहि प्रमाणांत मिळो, त्या वस्तूचें 'मूल्य' त्यामुळें कमी अगर अधिक होत नाहीं. जीवनाला पुष्टि देण्याचा जो गुण तिच्या अंगीं असेल अथवा नसेल, तो नित्य तसाच राहील. तुमच्या आवडीमुळें तो वाढणार नाहीं अथवा तुमच्या तिरस्कारानें तो कमीहि होणार नाहीं. तिच्या अंगची ती शक्ति मनुष्यमात्रांच्या व वस्तुमात्रांच्या विधात्यानें तिला दिलेली आहे.

राष्ट्रांनी जीवनपोषक पदार्थांची वासना धरावी व त्यांच्या निर्मितीसाठीं कष्ट करावेत, तसेच जीवनाला हानिकारक अशा वस्तूंचा तिरस्कार करावा व त्यांचा नाश करावा, असें शिकविणारें शास्त्रच खरें अर्थशास्त्र होय.

वैद्यकशास्त्र चेटुकविद्येहून भिन्न झालें, अथवा खगोलशास्त्र फलज्योतिषाहून भिन्न बनलें, तसें खोट्या अर्थशास्त्राहून हें खरें अर्थशास्त्र अद्यापि पृथक् व्हावयाचें आहे. बाल्यावस्थेंतील मनुष्यसमाजाला शिंपल्यांत राहणाऱ्या माशांच्या अंगांतून बाहेर पडणारा द्रव (मोतीं) आणि जांभळ्या किंवा तांबड्या रंगांचे खडे (हिरेमाणकें) हे पदार्थ बहुमोल वाटत असतात आणि जी श्रमशक्ति जीवनाचा विकास करण्यासाठीं व तें उदात्त बनविण्यासाठी उपयोगांत यावयास हवी, ती अशा वस्तूंच्या शोधार्थ समुद्रांत बुड्या मारण्याच्या कामीं अथवा खाणींतून काढलेल्या खड्यांना पैलू पाडण्याच्या कामी समाज लावीत असतो. याच बाल्यावस्थेमुळें त्यास हवा, प्रकाश आणि स्वच्छ राहणी यांसारख्या उपकारक व बहुमोल वस्तू मूल्यहीन वाटूं लागतात. तसेंच शांतता, परस्पर विश्वास आणि प्रेम इत्यादी सामाजिक जीवनास आवश्यक असणाऱ्या गोष्टी वेंचून सोनें, लोखंड अथवा शिंपल्यातील द्रव यांचा संचय करणें शहाणपणाचें आहे असें त्यास वाटूं लागतें. पण वस्तुतः शांतता, परस्पर विश्वास व प्रेम यांच्या आधारेंच मनुष्यास इतर वस्तूंचा उपभोग घेणें शक्य होत असतें. म्हणून अशा अवस्थेंतील समाजाला या बाबतींतील सत्यासत्याचा विवेक करण्यास शिकविणें, हेंच खऱ्या व श्रेष्ठ अर्थशास्त्राचें कार्य आहे. तसेंच दारिद्र्य, अपव्यय आणि मृत्यु या देवतांच्या उपासनेहून संपन्नता, संचय आणि ज्ञान या देवतांची उपासना कशी भिन्न आहे, तेंहि हें अर्थशास्त्र मनुष्यजातीला समजावून देईल. या प्रकारच्या लक्ष्मीच्या उपासनेनें तिच्या भक्तांचीं भांडारें समृद्ध होतील व तिच्या सर्वस्वाचा वारसा त्यांना मिळेल.

नाण्यांच्या पेट्या कितीहि उपयुक्त असल्या तरी त्यांच्याहून ही संचय-देवता श्रेष्ठ आहे, आणि सामान्यतः संपत्तीहून भिन्न गणली जाणारी आरोग्य-देवता हीहि तिचेंच एक स्वरूप आहे. येथपर्यंत मूल्याची व्याख्या झाली. आतां आपणांस संपत्ति या शब्दाची व्याख्या करावयाची आहे.

" उपयुक्त वस्तूंचा मोठा सांठा जवळ असणें म्हणजे श्रीमंत असणें होय " असें मिल्ल् म्हणतो.

ही व्याख्या मी स्वीकारितों, पण ती आपण पूर्णपणें समजून मात्र

घेतली पाहिजे. मी आपल्या विवेचनांत पुरेशी तार्किकता योजीत नाही, म्हणून माझे विरोधक पुष्कळ वेळां तक्रार करीत असतात. या ठिकाणीं मी तर्कशास्त्राचा इतका उपयोग करणार आहे की, तो कदाचित् त्यांना आवडणार नाही. पण हें अर्थशास्त्र म्हणजे कांही हलकें काम नाही आणि त्यातील कोणतेंहि पारिभाषिक शब्द अनिश्चित राहू देणें योग्य नाही.

मिल्लच्या वरील व्याख्येंतील 'जवळ असणें' अथवा 'ताब्यांत असणें' या शब्दांचा प्रथम विचार करू व नंतर त्यांतील 'उपयुक्त वस्तू' म्हणजे काय ते पाहू. 'ताब्यात असणें' याचा विचार पहिला. मिलन येथील कॅथेड्रलच्या कोपऱ्यावर सेंट कार्लो बोरोमिओ याचें शव तीनशें वर्षेपर्यंत मालमसाल्यात घालून पुरून ठेविलेलें आहे. त्याच्या हातात एक सोन्याची काठी आणि छातीवर रत्नखचित पाचूचा क्रूस आहे. ती काठी आणि ते पांचूचे खडे हे उपयुक्त पदार्थ आहेत असें मान्य केलें, तरी त्याच्यावर त्या शवाचा 'ताबा आहे' अथवा ते त्या शवा 'जवळ आहेत,' 'शवाचे आहेत' असें म्हणता येईल काय ? मालमत्ता या शब्दाच्या अर्थशास्त्रीय अर्थानें ती त्या शवाची मालमत्ता होऊं शकेल काय ? जर होऊं शकत नसेल, आणि म्हणून मृत शरीराला मालमत्ता असूं शकत नाही, असा सर्वसामान्य निष्कर्ष आपण यापासून काढणार असूं, तर 'मालकी' अथवा 'ताबा' सिद्ध होण्यास शरीरांत किती प्रमाणांत चैतन्य असलें पाहिजे व तें किती काल टिकणें अवश्य आहे यांचा विचार करावा लागेल.

उदाहरणार्थ, कॅलिफोर्निओतील एक जहाज अर्लाकडे फुटलें, तेव्हा त्यावरील एका उतारूनें पोहण्याच्या एका पट्ट्यात सोन्याचे दोनशें पौंड घालून तो आपल्या कमरेभोंवतीं बांधला व पुढें कांहीं काळानें त्या पट्ट्यासहित समुद्राच्या तळी तो सांपडला. अशा स्थितीत तो बुडत असतांना, तें सोनें त्याच्या 'ताब्यांत होतें' काय ? की तोच त्या सोन्याच्या ताब्यांत होता ?

आणि त्या मारानें तो समुद्रात बुडण्याऐवजी तें सोनें डोक्यावर आपटल्यामुळें त्याला वेड किंवा पक्षघातासारखा एकादा असाध्य रोग जडला असता, तर अशा परिस्थितींत तें सोनें त्याच्या 'ताब्यांत आहे'

असें म्हणणें पूर्वींच्यापेक्षां अधिक खरें ठरलें असतें काय ? सोन्यावरील ताब्याच्या या प्रश्नाची जीवनशक्तीच्या निरनिराळ्या अवस्थांचीं उदाहरणें देऊन अधिक छाननी करण्याची गरज नाहीं. हवी असल्यास अशी अनेक उदाहरणें मी देऊं शकेन. तथापि एवढ्यावरून असें दिसून येईल कीं, ' ताबा ' ही निरपेक्ष ' शक्ति ' नसून निरनिराळ्या प्रमाणांत असणारी सापेक्ष शक्ति आहे. ज्या वस्तूवर ताबा असावयाचा तिच्या आंगच्या गुणधर्मांवर अथवा तिच्या प्रमाणावरच ही शक्ति अवलंबून असते असें नाही, तर ज्या मनुष्याचा ताबा असावयाचा, त्याच्या पात्रतेवर आणि त्याच्या आंगच्या जीवनशक्तीवर ती अधिक प्रमाणांत अवलंबून असते, ही गोष्ट वाचकांस आता पटली असेल असें मी गृहीत धरतों.

आमची संपत्तीची व्याख्या आता विस्तृत बनवून पुढीलप्रमाणें सांगावी लागेल: " **ज्यांचा आपणास उपयोग करितां येईल** अशा उपयुक्त वस्तूंचा ताबा. " या व्याख्येंत हा फार महत्त्वाचा बदल झालेला आहे. कारण या बदलामुळें आमची संपत्ति केवळ ती आमच्याजवळ असण्यावर अवलंबून नसून आमच्या आंगच्या शक्तीवर अथवा पात्रतेवर ती अवलंबून राहाणार आहे. राष्ट्रीय मोक्षासाठी देशभक्त मृत्यूला वरतो तेव्हां तो त्याच्या विजयाचें चिन्ह बनतो, पण गुलामाला मृत्यूची शिक्षा देतात तेव्हां तोच मृत्यु त्याची लाचारी दाखवितो. अशीच संपत्तीची अवस्था आहे. आतांपर्यंत संपत्तीचा विचार केवळ जड वस्तूंचा संचय या दृष्टीनेंच झाला; पण यापुढें त्या वस्तूंचा उपभोग घेण्याच्या सामर्थ्याचा संचय, या दृष्टीनेंहि संपत्तीचा विचार केला पाहिजे, असें दिसूं लागेल.

येथपर्यंत आमच्या व्याख्येंतील क्रियापदाचा विचार झाला. आतां तिच्यांतील विशेषणाचा विचार करूं. ' उपयुक्त ' या शब्दाचा अर्थ काय ?

या प्रश्नाचा मागील प्रश्नाशी फार निकट संबंध आहे; कारण जी वस्तु कांहीं व्यक्तींच्या हातांत असल्यास उपयोगी बनण्याची शक्यता असते, तीच वस्तु इतरांच्या हातीं गेल्यास त्याच्या अगदीं विरुद्ध प्रकारची म्हणजे जिला दुरुपयोगी म्हणतां येईल, अशीहि बनण्याचा संभव असतो. वस्तूच्या अंगीं उपयुक्तता हा गुण यावयाचा कीं, दुरुपयुक्तता हा गुण यावयाचा, हें त्या वस्तूच्या आंगच्या गुणांपेक्षां उपयोग करणाऱ्या

व्यक्तीच्या गुणांवर अधिक अवलंबून असतें. उदाहरणार्थ, ग्रीक लोकांच्या कल्पनेप्रमाणें दारू ही मनुष्यामधील दैवी व मानवी अंशांना, ( म्हणजे त्याच्या बुद्धीला व इंद्रियांना ) उत्तेजन देणारी अशी मदिरादेवता किंवा भावदेवता होऊं शकते; आणि तिचाच दुरुपयोग केल्यास ती मनुष्याला हानिकारक व विशेषतः त्याच्या दैवी अंशाला–बुद्धीला–मारक अशी मदिराराक्षसीहि बनूं शकते. तसेंच हें आपलें शरीरसुद्धां सदुपयोगी किंवा दुरुपयोगी होऊं शकतं. त्याला आपण शिस्त लाविली आणि राष्ट्राच्या सेवेस लाविलें, तर त्याचा युद्धांत अथवा इतर राष्ट्रकार्यात उपयोग होईल, पण जर त्याला शिस्त लाविली नाहीं अथवा त्याचा दुरुपयोग केला तर तें राष्ट्राच्या दृष्टीनें मूल्यहीन ठरेल, आणि त्याचा उपयोग केवळ व्यक्तीच्या जीवनास ( आणि तोहि क्षुद्र प्रमाणांतच ) होऊं शकेल. ग्रीक लोक अशा व्यक्तीस ‘ इडिऑटिक ’ म्हणजे ‘ व्यक्तिनिष्ठ देह ’ असें म्हणत व त्यावरून असा मनुष्य राष्ट्राच्या दृष्टीनें प्रत्यक्षतः निरुपयोगी आहे असें दर्शवीत. याच शब्दापासून इंग्रजी भाषेत ‘ इडिअट ’ म्हणजे वेडपट हा शब्द आला आहे, व त्याचाहि मूळचा अर्थ केवळ स्वतःच्या देहापुरताच विचार करणारा माणूस असा आहे.

यावरून असें सिद्ध होतें कीं, एकादी वस्तु उपयुक्त ठरावयाची असेल तर केवळ तिच्या अंगीं उपयुक्त गुण असून भागणार नाहीं, तर तिचा सदुपयोग करणाराच्या हातींच ती असली पाहिजे. हीच गोष्ट नेमक्या शब्दांत व्यक्त करावयाची तर ‘ उपयुक्तता म्हणजे उपयोग करूं शकणाऱ्याच्या हातांतील मूल्य ’ असें म्हणतां येईल. अशा प्रकारें संचयशास्त्र या दृष्टीनें संपत्तिशास्त्राचा विचार करीत असतां, जड द्रव्याच्या संचयाप्रमाणेंच, त्याचा उपयोग करण्याच्या पात्रतेचा संचयहि लक्षांत घ्यावा लागतो. तसेंच या शास्त्रांत सांपत्तिक विभागणीचा विचार करतांना तो केवळ निरपेक्ष दृष्टीनें न करतां सापेक्ष विवेचक दृष्टीनेंच करावा लागतो. प्रत्येकास प्रत्येक वस्तु मिळावी या दृष्टीनें नव्हे, तर योग्य मनुष्यास योग्य वस्तु मिळावी, या दृष्टीनें विभागणीचा विचार करावा लागतो. हे मोठें बिकट शास्त्र आहे, व त्यांतील प्रश्न केवळ अंकगणिताच्या पद्धतीनें सुटणार नाहींत.

म्हणून उपयोग करूं शकणाऱ्याच्या हातांतील मूल्यवान् वस्तु म्हणजे संपत्ति होय. ( Wealth, therefore, is the possession of the valuable by the valient ). राष्ट्रांत असणारी एक शक्ति या दृष्टीनें जेव्हां आपण तिचा विचार करूं लागतों, तेव्हां तो या दोनहि दृष्टीनें करणें भाग आहे. पदार्थमात्राचें मूल्य आणि ते ज्यांच्या हातीं असतील त्यांच्या आंगची उपभोगपात्रता, या दृष्टीनें विचार केल्यास ज्यांना सामान्यतः संपत्तिमान् व्यक्ती असें गणिलें जातें, त्यांच्यापैकी पुष्कळांना संपत्तिमान् ही पदवी देणें हें त्यांच्या अवजड तिजोऱ्यांना लाविलेल्या कुलपांना संपत्तिमान् म्हणण्यासारखेंच ठरतें. कारण ते संपत्तिमान् बनण्यास जन्मतःच सदैव अपात्र असतात. अर्थशास्त्रीय दृष्टीनें राष्ट्रांत सांठलेल्या निर्जीव पाण्याच्या डबक्यासारखेच ते होत; किंवा संपत्तीच्या प्रवाहांतील भोंवरे असेंहि त्यांना म्हणतां येईल. हा प्रवाह वाहात असेल तोंपर्यंत त्यांचा कांहींच उपयोग होत नाहीं; झालाच तर लोकांना बुडविण्यासच उपयोग होतो. प्रवाह बंद झाल्यानंतर मात्र त्यांना महत्त्व प्राप्त होतें. अथवा नदीला घातलेल्या बांधांचीहि उपमा त्यांस देतां येईल. त्यांनीं अडविलेल्या पाण्याचा उपयोग ते स्वतः करूं शकत नाहींत, तथापि एकादा गिरणीवाला त्याचा उपयोग करूं शकेल. राष्ट्रीय संपत्तीच्या प्रवाहांतील ते केवळ अडथळेच होत, असेंहि त्यांचें वर्णन करितां येईल. त्यांच्यामुळें भोंवतालच्या लोकांचें जीवन उध्वस्त व संकटग्रस्त होतें. अशा संपत्तीस संपत्ति न म्हणतां 'विपत्ति' हेंच नांव देणें योग्य होईल. अशा संचयामुळें अखेरीस संपत्तीचा उपभोग दुरावतो, कारण असे संपत्तिमान लोक जिवंत असेपर्यंत ह्या संपत्तीचा कोणासहि उपयोग होऊं शकत नाहीं. एकादें राष्ट्र आपल्या संपत्तीचा फारच झपाट्यानें उपभोग घेऊं लागलें असेल, तर त्या कालांत राष्ट्राला संपत्तीचा उपभोग घेण्याच्या कामीं अडथळा आणणाऱ्या या लोकांचाहि कांहीं उपयोग होऊं शकेल. लोकांच्या अंगीं संपत्तीचा योग्य उपभोग घेण्याची पात्रता कशी आणावी ही एकच अडचण खऱ्या अर्थशास्त्रापुढें आहे असें नाहीं. त्याच्यापुढें खरी अडचण ही आहे कीं, मूल्यवान् वस्तू व उपभोगक्षमता यांच्या संयोगानेंच संपत्ति निर्माण होत असली, तरी या दोनहि गोष्टी परस्परांना विनाशक होत असतात.

या मुद्याकडेहि अर्थशास्त्रास लक्ष द्यावें लागतें. शीलवान् मनुष्य संपत्तीकडे दुर्लक्ष करूं शकतो अथवा तिचा त्यागहि करूं शकतो. पोप म्हणतो, "मनुष्याच्या अंगीं जे स्तुत्य गुण आहेत, त्यांच्यापैकीं बहुतेक गुणांमुळें श्रीमंतीची वाढ न होतां तिचा ऱ्हासच होत असतो." उलटपक्षीं भौतिक संपत्तीमुळें शीलाची हानीहि होऊं शकते. म्हणून संपत्तीचा तिच्या मालकांच्या मनावर कोणत्या प्रकारचा परिणाम घडत आहे ? कोणत्या प्रकारचे लोक संपत्तीच्या मागें लागले आहेत व यश मिळवीत आहेत ? तसेंच आपल्या चारित्र्यानें समाजाला नैतिक वळण लावून आणि धनोत्पादनास आवश्यक तें संशोधन करून आणि व्यावहारिक कर्तबगारी दाखवून जगावर श्रीमंतांनीं अधिक उपकार केले आहेत, कीं गरिबांनीं केले आहेत ? या सर्व प्रश्नांचा अखेरीस आपणांस विचार करावा लागणार आहे. तथापि मला पुढें सांगावयाच्या सिद्धांतांपैकीं दोन सिद्धांत येथें अगाऊ सांगितलेले बरे. ज्या समाजांतील आर्थिक व्यवहार केवळ मागणी–पुरवठ्याच्याच नियमांनीं नियंत्रित झालेले असतात पण ज्यांतील व्यक्तींना उघड अत्याचारापासून संरक्षण मिळूं शकतें, अशा समाजांत श्रीमंत बनणारे लोक सामान्यतः उद्योगी, निश्चयी, अहंकारी, लोभी, तत्पर, पद्धतशीर, व्यवहारदक्ष, प्रतिभाशून्य, दुसऱ्याच्या दुःखाविषयीं बेफिकीर आणि जड बुद्धीचे असे असतात व अशा समाजांत जे गरीब राहातात ते अतिमूर्ख, अतिशहाणे, आळशी, धाडसी, नम्र, विचारवंत, मंद, प्रतिभावान्, परदुःखानें विव्हल होणारे, अदूरदर्शी, वृत्तीनें दुष्ट, आचरट, शठ, उघड चोर, तसेंच पूर्ण दयावंत, न्यायशील, आणि पुण्यात्मे असे असतात.

हा संपत्तीचा विचार झाला. आतां बाजारभावाचा, म्हणजे विनिमय-मूल्याचा आणि नाण्यांत व्यक्त होणाऱ्या त्याच्या स्वरूपाचा विचार करावयाचा आहे.

विनिमयांतून नफ्याचा उद्भव होऊं शकत नाहीं हें या बाबतींतील लक्षांत घेण्याचें आद्यतत्त्व होय. श्रमांतूनच फक्त नफा उद्भवूं शकतो, विनिमयामुळें विनिमय करणाऱ्या दोघांचेंहि केवळ हित होतें. उदाहरणार्थ, एका मनुष्यानें एक माप धान्य पेरून पीक काढिलें व तें दोन मापें

बनविलें हा नफा ( वृद्धि ) झाला. दुसऱ्यानें खणून व लोखंड घडवून एका कुदळीच्या दोन कुदळी केल्या हाहि नफा झाला. पण ज्याच्याजवळ दोन मापें धान्य आहे, त्याला कित्येक वेळां खणण्याची गरज असते आणि ज्याच्याजवळ दोन कुदळी आहेत, त्याला कित्येक वेळां खाण्याची गरज असते. पाहिला आपल्या जवळचें जादा धान्य देऊन दुसऱ्या-जवळचें जादा अवजार त्याच्या मोबदल्यांत घेतो. या व्यवहारामुळें जरी दोघांचेंहि हित झालेलें आहे तरी कोणासहि नफा झालेला नाहीं, संपत्तीची वाढ किंवा नवें उत्पादन झालेलें नाहीं. जें पूर्वीच उत्पन्न झालेलें होतें, तें ज्याला त्याचा उपयोग करतां येईल त्यास देण्यांत आलें. हा विनिमय करण्यास जर कांहीं कष्ट पडत असतील तर त्यांचा अंतर्भाव उत्पादनाच्या कष्टांतच केला पाहिजे, व या श्रमांतूनहि इतर श्रमांप्रमाणें नफा उत्पन्न होणें शक्य आहे. संपत्तीच्या उत्पादनांत व तिच्या वाहतुकींत जितक्या लोकांचा संबंध येतो, त्या सर्वांना नफ्याचा अंश मिळाला पाहिजे. पण उत्पादन व वाहतुक म्हणजे विनिमय नव्हे. नुसत्या विनिमयांत नफा असूं शकत नाहीं.

तरीहि विनिमयांतून धन संपादन होऊं शकेल. जर एकाद्या मनुष्यास स्वतः कमी कष्टानें निर्माण केलेली वस्तु दुसऱ्यास देऊन त्याच्याकडून अधिक कष्टानें निर्माण झालेली वस्तु मिळवितां आली, तर दुसऱ्याच्या श्रमानें निर्माण झालेली कांहीं संपत्ति त्याच्या पदरांत पडेल. अशा प्रकारें तो जितकी संपत्ति कमावील, तितकीच दुसरा गमावील. व्यापारीभाषेत अशा प्रकारें संपत्ति कमावणाऱ्यानें नफा मिळविला असें सामान्यतः म्हणतात, आणि अशा प्रकारें मिळणारा नफा प्रत्येकास मिळवितां येईल अशी आमच्या व्यापाऱ्यांपैकीं पुष्कळांची दृढ समजूत असावी असें वाटतें. पण आमच्या जगाची अशी दुर्दैवी घटना आहे कीं, त्यांतील पदार्थां-( Matter and motion ) चे व गतीचे नियम अशा प्रकारचा नफा कोणासहि मिळवूं देत नाहीत. भौतिक संपत्तीची वृद्धि केवळ उत्पादनानें अथवा संशोधनानेंच होऊं शकते. ती विनिमयानें होऊं शकत नाहीं. विनिमयानें जेथें जेथें भौतिक नफा झाल्याचें दिसतें, तेथें या प्रत्येक ‘ धन ’ संख्येबरोबर तेवढीच ‘ ऋण ’ संख्या निर्माण होत असते.

अर्थशास्त्राच्या दुर्दैवानें या धनसंख्या जगाच्या डोळ्यांत एकदम भरतात आणि प्रतिष्ठा पावतात. अर्थात् इतके भव्य परिणाम घडवून आणणाऱ्या या शास्त्राचें अध्ययन करण्याची उत्सुकता प्रत्येक मनुष्यास वाटूं लागते. त्याच्या उलट ‘ ऋण ’ संख्या मागें पडतात, बाजूच्या गल्लींत किंवा अंधाऱ्या जागेंत त्या दृष्टीआड होतात, अथवा कबरस्थानांत गाडल्या जाऊन त्या कायमच्याच अदृश्य होतात. यामुळें या शास्त्राचें हें बीजगणित मोठें विलक्षण बनलें असून तें वाचणेंहि कठिण झालें आहे. त्यांतील बऱ्याचशा ऋणसंख्या, त्यांच्या लेखकानें एक प्रकारच्या लाल शाईनें लिहिलेल्या आहेत, पण ती शाई अर्धपोटी मजुरांच्या रक्ताप्रमाणें विलक्षण फिकी, पुसट व अगदींच अदृश्य बनलेली आहे.

‘ विनिमयशास्त्र ’ ज्याला आतां ‘ कॅटेलेक्टिक्स् ’ असें नांव देण्याचें कांहीं लोकांच्या मनांत आहे, तें नफा मिळविण्याच्या दृष्टीनें निरर्थकच होय; पण धनसंपादनाच्या दृष्टीनें त्याचें स्वरूप अगदीच विलक्षण आहे. इतर कोणत्याहि शास्त्राहून त्याचा आधार व त्याची गृहीतकृत्यें, हीं अगदीं भिन्न आहेत. उदाहरणार्थ, मीं एकाद्या रानटी मनुष्यास एक सुई दिली आणि त्याच्या मोबदला त्याच्यापासून एक हिरा घेतला, तर हा विनिमय करण्याची माझी शक्ति दोहोंपैकी कोणत्या तरी एका गोष्टीवर अवलंबून असेल. एकतर, त्या रानटी मनुष्यास युरोपांतील सामाजिक व्यवहारांचें मुळींच ज्ञान नसलें पाहिजे, किंवा या व्यवहारांचा फायदा घेऊन आपल्या हिऱ्याच्या मोबदला अधिक सुया देणाऱ्या दुसऱ्या कोणास तो विकण्याची शक्ति तरी त्याच्यापाशीं नसली पाहिजे. त्याच्याहि पुढें जाऊन जर मीं त्याला अशी सुई दिली कीं, तिला नेढेंच नाहीं, ( लाभशास्त्राच्या दृष्टीनें माझा हा व्यवहार अगदीं आदर्शच ठरतो ) तर मला होणारा नफा मी ज्या व्यक्तीशीं हा व्यवहार करणार त्या व्यक्तीच्या अज्ञानावर, दौर्बल्यावर अथवा निष्काळजीपणावरच पूर्णपणें अवलंबून असणार हें उघड आहे. या गोष्टी तेथें नसतील, तर अशा विनिमयांत लाभ मिळणें अशक्यच होईल. म्हणून जितक्या प्रमाणांत विनिमयशास्त्र हें विनिमय करणाऱ्या दोन पक्षांपैकीं फक्त एकाच पक्षाच्या लाभाचा विचार करील, तितक्या प्रमाणांत त्याचा आधार दुसऱ्या पक्षाच्या अज्ञानावर

व दौर्बल्यावरच असणार हें उघड आहे. जेथें तीं नसतील तेथें तें शास्त्रहि उरणार नाहीं. म्हणून ही विद्या अविद्येवर उभारलेली आहे आणि ही कला कलाहीनतेवर आधारलेली आहे. पण इतर सर्व विद्यांचें व कलांचें ध्येय अविद्येचें व कलाहीनतेचें निरसन करणें हेंच असतें. हें एकटें शास्त्र मात्र असें आहे कीं, त्याला तद्विरोधी असें जें अज्ञान तें चिरंतन करण्यासाठीं व प्रसृत करण्यासाठीं आपली सर्व शक्ति वेंचावी लागते; असें न केलें तर त्या शास्त्राला अस्तित्वच उरणार नाहीं. म्हणून अज्ञानाचें—अंधकाराचें—असें हेंच एक विशिष्ट शास्त्र आहे. हें दैवी शास्त्र नसून त्याचा जनक हा कोणीतरी मायावी असुर असला पाहिजे. आपल्या संततीस धोंड्याच्या भाकरी बनविण्यास सांगून स्वतः मात्र भाकरीचे धोंडे बनविण्यांत तो गुंतला आहे आणि त्याच्याकडे मासे मागितले असतां शेतीतून मासे मिळणें शक्य नसल्यानें तुमच्या पदरांत तो सांप टाकीत आहे.

तेव्हां न्याय्य अर्थशास्त्रीय विनिमय कसा असावा, याचा सामान्य नियम अगदीं साधा आहे. तो असा : विनिमय करण्यापासून दोन्हीहि पक्षांस लाभ झाला पाहिजे, ( निदान एका पक्षास लाभ झाला असतां दुसऱ्या पक्षाची हानि तरी होतां कामा नये). तसेंच जे मध्यस्थ म्हणजे व्यापारी असतील त्यांना आपल्या बुद्धीचें, श्रमाचें आणि कालाचें न्याय्य वेतन मिळालें पाहिजे. कोणत्याहि पक्षास जो लाभ झाला असेल अथवा मध्यस्थांस जें वेतन मिळालें असेल, तें त्या व्यवहाराशीं संबंध असलेल्या सर्वांना पूर्णपणें माहीत असलें पाहिजे. व्यवहारांत कोठेंहि गुप्तता ठेवण्याचे प्रयत्न होत असतील तर अविद्येवर आधारलेल्या आसुरी शास्त्राचा व्यवहार कोठेंतरी चालू आहे असें समजावयास हरकत नाहीं. म्हणूनच तो ज्यू व्यापारी दुसऱ्या एका ठिकाणीं म्हणतो, " ज्याप्रमाणें दोन दगड सांधणारा खिळा दोहोंतहि घुसत असतो, त्याचप्रमाणें क्रय आणि विक्रय या दोन्हीहि क्रियांत पाप घुसलेलें असतें. " लोखंडी खिळ्यांनीं सांधलेला दगड-लांकडांचा कोट ज्याप्रमाणें विद्युत्पातानें उध्वस्त होतो त्याचप्रमाणें लोभमूलक पापी क्रयविक्रय व्यवहारांवर उभारलेली सामाजिक रचना परमेश्वरी प्रकोपानें उध्वस्त होईल. ।

विनिमयासंबंधीं विवेचन करतांना मी आतांपर्यंत फक्त 'लाभ' हा एकच शब्द योजिलेला आहे; पण या लाभांत दोन कल्पना अंतर्भूत होत असतात. आपल्या **गरजा** भागणें हा एक प्रकार असून आपल्या **वासना** तृप्त होणें हा त्याचाच दुसरा प्रकार आहे. आजच्या जगांत ज्या वस्तूंना मागणी असते त्यांपैकीं तीनचतुर्थांश वस्तू काल्पनिक गरजा अथवा वासना भागविणाऱ्याच असतात. लोकांच्या आवडी, आकांक्षा, ध्येयें अथवा भ्रम यांच्यावरच त्या वस्तूंची मागणी आधारलेली असते. म्हणून आपल्या आयव्ययाचें नियमन करणें, म्हणजे आपल्या भावनांचें व आकांक्षांचें नियंत्रण करणें असाच अर्थ तत्त्वतः करावा लागतो. म्हणून बाजारभावांचें योग्य विवेचन करण्याच्या प्रश्नाला फार कठिण अशा आध्यात्मिक व मानसशास्त्रीय प्रश्नांचें स्वरूप प्राप्त होतें व त्याचा निर्णय पुष्कळ वेळां भावनेनेंच करावा लागतो. डेव्हिडनें बेथलहॅमच्या वेशी-जवळील विहिरींतील पाण्याचें मूल्य तीन सैनिकांच्या प्राणांइतकें मानिलें तें त्याच भावनादृष्टीनें होय.

बाजारभावाचा निर्णय करतांना पुढील गोष्टींचा विचार करावा लागतो. कोणत्याहि वस्तूचा भाव, म्हणजे ती मिळविण्यासाठीं एकाद्या मनुष्यास जे श्रम वेंचावे लागतात ते श्रमच होत. हा भाव पुढील चार गोष्टींवर अवलंबून असतो व त्या नित्य कमीअधिक होत असतात. (१) ती वस्तु प्राप्त होण्यासंबंधीं ग्राहकास असणाऱ्या वासनेची तीव्रता. (२) हिच्याशीं विरोधी अशी तीच वस्तु आपल्यापाशीं ठेवण्याच्या विक्रेत्यास असणाऱ्या इच्छेची तीव्रता. (३) ती वस्तु स्वतः संपादन करण्यासाठीं ग्राहकास करतां येणाऱ्या श्रमांचें प्रमाण आणि (४) ती वस्तु आपणापाशीं ठेवण्यासाठीं विक्रेता जितके कष्ट भोगण्यास तयार असेल त्यांचें प्रमाण. या गोष्टी जेव्हां जादा प्रमाणांत असतील तेव्हांच त्या कार्यक्षम बनतात. म्हणजे वासनेची तीव्रता याचा अर्थ इतर वस्तूंच्या वासनेपेक्षां या विशिष्ट वस्तूसंबंधीं असणाऱ्या वासनेचें आधिक्य. तसेंच त्या वस्तूसाठीं देण्याचे श्रम, म्हणजे इतर वस्तूंसाठीं कराव्या लागणाऱ्या श्रमांहून या वस्तूसाठीं कराव्या लागणाऱ्या श्रमांचें आधिक्य.

म्हणूनच बाजारभावांचा प्रश्न अतिशय संकीर्ण, विलक्षण आणि

औत्सुक्यपूर्ण बनत असतो; तथापि तो इतका संकीर्ण आहे की, त्याचें विवेचन आपणांस इतक्यांत करतां येणार नाहीं. पण ज्या अर्थी प्रत्येक वस्तूचा भाव हा अंतिम दृष्टया श्रमांतच मोजावयाचा असतो त्या अर्थी त्या श्रमांचें परिमाण आधीं आपण निर्णीत केलें पाहिजे.

श्रम म्हणजे जीवनशक्तीचा मृत्यूशी चालू असलेला लढाच होय. जीवन या शब्दांत मानवाच्या शारीरिक, बौद्धिक व आत्मिक शक्तींचा अंतर्भाव होतो आणि एकादा प्रश्न सोडविणें, अडचण उल्लंघणें, प्रयोग करणें अथवा भौतिक शक्तीचा प्रतिकार करणें इत्यादी अनेक रूपानें ही जीवनशक्ति विरोधी शक्तींशीं झुंजत असते.

कोणत्याहि श्रमांत जीवनांतील विविध शक्तींचा ज्या प्रमाणांत अंतर्भाव होत असेल, त्या मानानें ते श्रम श्रेष्ठ अथवा कनिष्ठ दर्जाचे ठरत असतात, आणि कोणत्याहि प्रकारच्या श्रेष्ठ दर्जाच्या कामांत शरीरशक्ति संपूर्ण व योग्य प्रकारें उपयोगांत येण्यास योग्य प्रमाणांत बुद्धीची व भावनेची शक्तीहि तींत अंतर्भूत व्हावी लागते.

आपण श्रमांच्या मूल्यासंबंधीं किंवा भावासंबंधीं विवेचन करीत असतों, तेव्हां त्या श्रमांचा विशिष्ट प्रकार आणि विशिष्ट दर्जा लक्षांत घेऊनच बोललें पाहिजे. जसें सोन्यासंबंधीं किंवा चांदीसंबंधीं बोलत असतां आपण त्यांचा विशिष्ट कस लक्षांत घेऊन बोलत असतों तसेंच हें आहे. खोट्या लोखंडाचा किंवा हिणकस सोन्याचा भाव जसा सांगतां येत नाहीं, त्याचप्रमाणें अज्ञपणानें, अतज्ञतेनें आणि भावशून्य वृत्तीनें केलेल्या हीन श्रमांचेंहि मूल्य ठरवितां येणार नाहीं.

एकदां श्रमाचा दर्जा आणि स्वरूप हीं निश्चित झालीं, म्हणजे इतर कोणत्याहि मूल्यवान् पदार्थाप्रमाणें त्याचेंहि मूल्य निश्चित ठरतें, परंतु इतर पदार्थांबरोबर होणाऱ्या त्याच्या विनिमयाच्या प्रमाणांत मात्र बदल होतात. हे बदल अंदाजतांना इतर वस्तूंचेंहि मूल्य त्यांच्या निर्मितीस लागणाऱ्या श्रमांच्या परिमाणानेंच ठरविण्यांत आलें पाहिजे. याच्या उलट श्रमाचें मूल्य मात्र इतर पदार्थांनीं मोजतां कामा नये.

उदाहरणार्थ, आपणांस एक फळांचें झाड लावावयाचें असल्यास तें खडकाळ जमिनींत लावण्यास दोन तास कष्ट करावे लागतील तर मऊ

जमिनींत तेंच झाड कदाचित् अर्ध्या तासांत लावितां येईल. अशी कल्पना करूं की, या दोन्हीहि ठिकाणची जमीन त्या झाडाच्या वाढीच्या दृष्टीनें सारखीच कसदार आहे. अशा परिस्थितींत दोन तास कष्ट करून लाविलेल्या झाडाची किंमत केवळ अर्ध्या तासांत लाविलेल्या झाडाच्या किंमतीहून अधिक ठरणार नाही. पहिल्याला जितकीं फळें लागणार तितकींच दुसऱ्यालाहि लागतील. तसेंच एका अर्ध्या तासाच्या कामाचें जें मूल्य, तेंच दुसऱ्या अर्ध्या तासाचेंहि मूल्य धरलें पाहिजे; पण पहिलें झाड लाविण्याला दुसऱ्या झाडाच्या लागवडीपेक्षां चौपट श्रम पडलेले आहेत ही गोष्ट यथार्थपणें व्यक्त करावयाची, तर खडकाळ जमिनींत केलेल्या श्रमांचें मोल कमी ठरलें असें न म्हणता, त्या जमिनीत लाविलेलें झाड अधिक महाग पडलें असें म्हटलें पाहिजे. पण त्याचें विनिमयमूल्य हें पुढें या गोष्टीवर अवलंबून असेल किंवा नसेल, हें कांही सांगतां येणार नाही. लागवड करण्यासारखी मऊ जमीन मुबलक असेल, तर झाडाला किंमत देतांना खडकाळ जमिनींत लागवड करण्यास जे श्रम पडले, त्याचा लोक मुळींच विचार करणार नाहीत. वनस्पतिशास्त्राचें ज्ञान नसल्यामुळें आपण फळझाडाऐवजीं विषवृक्षाचीच लागवड केली असेल, तर त्याचें विनिमय-मूल्य ऋणसंख्येनेंहि व्यक्त करावें लागेल आणि आपण केलेल्या श्रमांशीं या मूल्याचें प्रमाण तर त्याहूनहि कमी पडेल.

एकाद्या ठिकाणीं काम स्वस्त मिळतें असें आपण म्हणतों, तेव्हां वस्तुतः तेथें श्रम सफल होण्यास बरेच अडथळे असल्यानें थोडें फल पदरांत पाडण्यास लोकांना अधिक कष्ट करावे लागतात, असा आपला भावार्थ असतो. म्हणून हा भाव व्यक्त करतांना काम स्वस्त आहे असें न म्हणतां तेथें श्रमानें उत्पन्न होणारे पदार्थ महाग आहेत, असेंच आपण म्हटलें पाहिजे. आपणांस जेवावयास घरीं येतांना रोज दहा मैल चालावें लागत असेल, तर अशा परिस्थितींत चालण्याची किंमत कमी आहे असें आपण म्हणणार नाहीं, किंवा तें जेवण संपादन करण्यास आपणांस जर दहा तास खपावें लागत असेल, तर आपल्या श्रमाला किंमत कमी आहे असें आपण म्हणतां कामा नये, तर तें जेवण आपणांस महाग पडतें असेंच म्हटलें पाहिजे.

शेवटीं ज्या शब्दाची व्याख्या आपणांस करावयाची आहे, तो शब्द म्हणजे " उत्पादन " हा होय.

येथपर्यंत सर्वच श्रम हे लाभदायक असतात असें समजून मीं लिहिलें आहे; कारण श्रमाचें मूल्य, त्याचा दर्जा आणि त्याचा हेतु या सर्वांचा विचार एकाच वेळीं करणें शक्य नव्हतें. पण श्रेष्ठ दर्जाचे श्रमहि अनेक हेतूंनीं प्रेरित होऊन करतां येणें शक्य असतें. ते श्रम शेतीप्रमाणें विधायक स्वरूपाचे असतील; रत्नांना पैलू पाडण्यासारखे निरर्थक असूं शकतील; किंवा युद्धाप्रमाणें विध्वंसक स्वरूपाचेहि असूं शकतील. परंतु जे श्रम उघडउघड निरर्थक असतात ते खरोखर तसे आहेत हें सिद्ध करणें पुष्कळ वेळां सोपें नसतें. तथापि " जें विधायक नाहीं तें विध्वंसक असतें " हा नियम सामान्यतः खरा धरून चालण्यास हरकत नाहीं. लोकांतील आचरट व कलाहीन वृत्तीला आणि अहंकाराला चालना देत असल्यानें रत्नांना पैलू पाडण्याचें काम प्रायः अत्यंत हानिकारक ठरतें, हें या सिद्धांताचें एक उदाहरण म्हणून सांगतां येईल. म्हणून अखेरीस मला असें वाटतें कीं, सर्व कामांचे 'धन' व 'ऋण' किंवा 'विधायक' व 'विध्वंसक' असे दोनच वर्ग पाडतां येतील. विधायक म्हणजे जीवनाला पोषक आणि विध्वंसक म्हणजे जीवनाला मारक. या दृष्टीनें खून करण्याचें काम हें पूर्णपणें विध्वंसक आणि अपत्यधारण व संगोपन हें शुद्ध विधायक काम होय. म्हणूनच निरुद्योगी राहणें हा मध्यबिंदु कल्पिल्यास, खून करण्याचें तिरस्करणीय काम हें त्याच्या एका दिशेस ठेविलें तर अपत्यसंगोपनाचें स्तुत्य काम त्याच्यापासून पहिल्याच्या विरुद्ध दिशेस ठेवावें लागेल. म्हणूनच अपत्य-संगोपनाच्या कार्याला जो सन्मान आहे तो व्यक्त करण्याच्या बुद्धीनें पत्नीला द्राक्षाच्या वेलीचा दृष्टांत देत असतात आणि मुलांना स्तुत्य अशा शांततादर्शक ऑलिव्ह शाखेची उपमा देतात. मुलें हीं शांततादर्शक मानण्याचें कारण असें आहे कीं, जेव्हां देशांत शांतता असेल तेव्हांच समाजांत पुष्कळ मुलें असणारीं मोठीं कुटुंबें नांदूं शकतात. तीं मुलें अनेक देशांत पसरलेलीं अथवा प्रवासास गेलेलीं असलीं तरी सर्व दिशांना फेकलेले बाण जसे पराक्रमी बाहूंचें बल व्यक्त करतात, त्याचप्रमाणें सर्वत्र संचार

करून आपला देश प्रबल बनविणारे नागरिक आपल्या राष्ट्राचें सामर्थ्य व्यक्त करतात.

अशा प्रकारें श्रम हे परिणामतः विविध प्रकारचे असल्यानें कोणतेंहि राष्ट्र जीवनास पोषक अशा वस्तू निर्माण करण्याच्या व उपभोगाच्या कामीं आपली श्रमशक्ति किती प्रमाणांत वेंचितें त्यावर त्याचें वैभव अवलंबून असतें. 'निर्माण करण्याच्या' व 'उपभोग घेण्याच्या' कामीं असे दोन्हीहि शब्दप्रयोग मी केले आहेत, हें लक्षांत घ्या. म्हणजे धनाचें केवळ उत्पादनच शहाणपणानें केलें पाहिजे असें नाहीं, तर त्याचें विभाजन व उपभोग हेहि शहाणपणानेंच झाले पाहिजेत. पुष्कळसे अर्थशास्त्रज्ञ नेहमीं अशा प्रकारें लिहीत असतात कीं, वस्तूंच्या केवळ उपभोगाला कांहीं महत्त्वच नाहीं. हें तर खरें नाहींच पण याच्या उलट असें म्हटलें पाहिजे कीं, केवळ उपभोग हाच संपत्तीच्या निर्मितीचा अंतिम उद्देश, साध्य आणि परिणति होय. तसेंच उत्पादनकलेंतील नैपुण्यापेक्षां उपभोगाच्या कलेंतील नैपुण्य हें फार कठिण आहे. पैसे मिळवूं शकणाऱ्या वीस लोकांत एकादाच असा असतो कीं, ज्याला त्यांचा योग्य प्रकारें उपभोग घेतां येतो, आणि राष्ट्राच्या दृष्टीनें असो की व्यक्तीच्या दृष्टीनें असो, जिव्हाळ्याचा प्रश्न ते "किती पैसा मिळवितात ?" हा नसून ते "तो पैसा कोणत्या कामीं लावितात ?" हाच असतो.

आतांपर्यंत मीं भांडवल व त्याचें कार्य यांचा क्वचित्‌च उल्लेख केल्याचें पाहून कदाचित् वाचकांस आश्चर्य वाटलें असेल. त्यांच्या व्याख्या करण्याचें हेंच स्थळ होय.

'भांडवल' या शब्दावरून 'सांठा, उगम किंवा मूलद्रव्य' असा बोध होत असतो. ज्या मूलद्रव्यापासून दुसरें द्रव्य निर्माण होतें, तें मूलद्रव्य म्हणजे भांडवल होय. जेव्हां तें आपणाहून भिन्न असें दुसरें द्रव्य निर्माण करील तेव्हांच त्यास भांडवल असें नांव देतां येईल. मूळ हें फळ निर्मिल्यावांचून सार्थ होऊं शकत नाहीं, त्याचप्रमाणें भांडवल हें दुसरें कांहींतरी निर्माण केल्याशिवाय सार्थ होऊं शकत नाहीं. मुळांतून निर्माण झालेल्या फळापासून पुनः मूळ निर्माण होतें, तसें भांडवलांतूनहि

पुनः भांडवल निर्माण होतें; पण जें भांडवल भांडवलाव्यतिरिक्त दुसरें कांहींच निर्माण करूं शकत नाहीं, तें केवळ दुसरें मूळ निर्माण करणाऱ्या मुळासारखें अथवा केवळ दुसरी कळी निर्माण करणाऱ्या कळीसारखें निरर्थक होय. मुळापासून फळ अथवा कळीपासून फूल केव्हांच निर्माण न होईल तर त्यांचा उपयोग काय ? बियांतून बींच निर्माण होईल व त्याची भाकरी कधीच बनणार नसेल, तर तें निरर्थक होईल. आजपर्यंत युरोपीय अर्थशास्त्रानें केवळ कळ्या कशा तयार कराव्यात अथवा खुडून आणाव्यात त्याचाच विचार केला आहे. फुलांची निपज करण्याच्या कलेचा विचारच त्यांनीं केलेला नाहीं. कदाचित् ते तापविलेल्या रसाचे अथवा कांचेचे कळे किंवा गोळे असतील. त्यांची पूड खावयाची की काय ? ही कांचेचीच पूड असेल तर बंदुकीच्या दारूच्या पुडीपेक्षां तरी बरी. अर्थशास्त्रज्ञांनी केवळ अशा संचयाचाच विचार केलेला आहे. पण त्याच्या उपयोगाचा विचार केलेला नाहीं. भांडवलाची कल्पना याहून अधिक स्पष्ट अशी आपणांस करतां येतें काय तें पाहूं.

भांडवलाचें अगदीं साधें आणि समर्पक असें व्यावहारिक उदाहरण म्हणजे, उत्कृष्ट नांगर हें होय. जर या नांगरापासून नागराव्यतिरिक्त दुसऱ्या कशाचीच निपज करणें शक्य नसेल तर त्याच्या कितीहि रांगा मांडून ठेविल्या अथवा त्या उन्हांत कितीहि चकाकत असल्या तरी भांडवल-दृष्टीनें त्यांना कांहीं किंमत उरणार नाही. खऱ्या भांडवलाचें वैभव निराळेंच असतें. जमीन नांगरतांना त्याची जी झीज होते तिच्यामुळें तें चकाकूं लागतें. या उदात्त घर्षणामुळें नांगराचें द्रव्य वाढत नसतें तर तें घटत असतें. “ तुमच्यापाशीं किती नांगर आहेत ? ” असा प्रश्न करण्याऐवजीं “ तुम्ही नांगरलेली जमीन कोठें आहे ? ” असा प्रश्न प्रत्येक राष्ट्राला व प्रत्येक भांडवलदाराला विचारला पाहिजे. “ हें भांडवल पुनः दुसरे भांडवल किती लवकर निर्माण करील ? ” हा प्रश्न महत्त्वाचा नसून “ भांडवल-रूपानें जन्मास येण्यापूर्वी याव्यतिरिक्त तें अन्य कोणतें कार्य करणार आहे ? ” हाच प्रश्न महत्त्वाचा असतो. जीवनाला पोषक असें कोणतें द्रव्य त्यापासून निर्माण होणार आहे ? जीवनाचें रक्षण करणारें कोणतें विधायक कार्य तें करणार आहे ? जर तें असें काहींच करणार नसेल, तर त्याची पुनर्निर्मिति

ही निरर्थकच ठरेल आणि जर तें जीवनाला विघातक वस्तू निर्माण करणार असेल, तर ती पुनर्निर्मिति त्याहूनहि हीन ठरेल. अशा भांडवलावर मिळणारा नफा हा नफा नसून आपली मालमत्ता गहाण टाकून सूडदेवतेकडून काढलेलें कर्जच तें ठरेल.

अशा रीतीनें मिळणारा नफा हा खरा लाभ नव्हे, हें प्राचीन लोकांना माहीत होतें व तेंच त्यांनीं इक्सियनच्या कथेनें सूचित केलें आहे. पाण्याचीं उगमस्थानें ढग आहेत, तसेंच भांडवल हें संपत्तीचें उगमस्थान आहे. पण या ढगांत जेव्हा पाणी नसतें आणि एका ढगांतून केवळ दुसऱ्या ढगांचाच उद्भव होऊं लागतो, तेव्हां पावसाच्या ऐवजीं ते क्रोधगर्जना करू लागतात आणि पिकाच्या ऐवजीं विजेचा लोळ येऊन जमिनीवर पडतो. इक्सियन यानें आपल्या पाहुण्यांस प्रथम मेजवानीस म्हणून बोलाविलें आणि मग त्याना आगीच्या खाईत लोटून त्यांचा छळ केला. संपत्तीच्या मोहाला वश होणाऱ्याना भोगाव्या लागणाऱ्या क्लेशांचें दिग्दर्शन या कथेंत करण्यात आलें आहे. संपत्तीच्या लोभातून पुढें सत्तेचा लोभ निपजतो व सत्तेचें खरें स्वरूप न समजल्यानें इतरांना त्रास देऊन तो मनुष्य अखेरीस स्वतःहि बंदींत पडतो व क्लेश भोगूं लागतो. हें दर्शविण्यासाठीं इक्सियनच्या कथेंत पुढें वर्णिलें आहे कीं, त्याला जूनोचा( ज्युपीटरच्या पत्नीचा ) अभिलाष उत्पन्न झाला, पण जूनोच्या ऐवजीं त्यानें त्या आकृतीच्या एका मेघालाच आलिंगन दिलें व त्यापासून त्याला सेंटॉर्स ही संतति झाली. त्यांचें शरीर अर्धें घोड्यासारखें व अर्धें मनुष्या-सारखें होतें. केवळ संपत्तीमुळें प्राप्त होणाऱ्या सत्तेचा उपभोग हा छायेला दिलेल्या आलिंगनाप्रमाणें असुखावह असतो, पण अशा संयोगापासून निर्माण होणारी संतति ही मात्र अर्धमानवी आणि अर्धपाशवी असते. मनुष्यांप्रमाणें बुद्धीचा व शस्त्रांचा उपयोग हे सेंटॉर्स करूं शकत आणि त्यांचें खाणें घोड्यासारखें असून आपल्या टापांखालीं ते लोकांना तुडवीत जात. आपल्या पापकर्माबद्दल इक्सियन याला अखेरीस दांते असणाऱ्या एका जळत्या चक्रावर बांधण्यांत आलें व तें चक्र आकाशांत एकसारखें फिरतें ठेवण्यांत आलें. हें चक्र मानवांच्या स्वार्थी पण निष्फळ कर्मांचें निदर्शक आहे. या चक्रांत चैतन्य किंवा प्राण नाहीं, व तें केवळ दैवयोगानेंच

फिरत असतें. पण मनुष्यांच्या सत्कर्मांमुळें फिरणारें चक्र चैतन्ययुक्त असतें आणि तें देवदूतांच्या प्रदेशांतच त्यांच्यासह संचार करीत असतें.

भांडवलाचें खरें स्वरूप हें असें असल्यानें कोणत्याहि उद्योगी राष्ट्रांत नेहमीं दोन प्रकारचें उत्पादन सुरू असतें. एकांतून बीं निपजतें व दुसऱ्यांतून अन्न निर्माण होतें, किंवा पहिलें भूमीत पडतें व दुसरें तोंडांत पडतें. लोभी लोकांना कोठारांत भरून टेवणें हाच त्यांचा उपयोग वाटतो. पण कोठारांचा उपयोग हा फक्त दरम्यानचा असतो. मध्यंतरीच्या काळांत रक्षण करणें हेंच त्यांचें कार्य. धान्याचें विभाजन होईल, तेव्हांच त्याचा उद्देश सफल होतो. तसें न होईल तर तें फक्त कुजून जाईल अथवा त्यामुळें किडे व उंदीर यांचेंच पोषण होईल. तसेंच भूमींत पेरावयाचें बीं हें-सुद्धां अखेरीस तोंडांत जाणारें अन्न निर्माण करण्यासाठींच असल्यानें सर्व उत्पादन हें वस्तुतः उपभोगासाठींच असलें पाहिजे. उपभोग हेंच उत्पादनाचें उद्दिष्ट होय व त्यापासून किती लोकांना अन्न मिळतें यावरूनच त्याचें मोजमाप करावें लागतें. राष्ट्राची संपत्ति मोजावयाची तर तें राष्ट्र किती वस्तूंचा उपभोग घेतें, यावरूनच ती मोजली पाहिजे.

या गोष्टीचें स्पष्ट ज्ञान नसणें हाच अर्थशास्त्रज्ञांचा मूलभूत प्रमाद होय. प्रमादाच्या भांडवलावर पुष्कळ चुकांचें व्याज व उत्पन्न त्यांनीं काढिलेलें आहे. त्यांचें सर्व लक्ष केवळ पैशांत मिळणाऱ्या नफ्यावरच खिळलेलें असतें. त्यामुळें किती तोंडांत घास पडणार आहेत इकडे त्यांचें लक्ष जात नाहीं. पारध्यानें ठेवलेल्या कांचेच्या भांड्याच्या चकाकीला भुलून पक्षी तिकडे आकर्षिले जातात, तसेच हे अर्थशास्त्रज्ञ नाण्यांच्या अनेक अमिषांना भुलून अनेक जाळ्यांत अडकले जातात. अथवा त्यांना पक्ष्यांपेक्षां मुलांचीच उपमा अधिक यथार्थतेनें देतां येईल. लहान मुलें जशीं आपल्या सावलीच्या पलीकडे उडी मारण्याचा निष्फळ यत्न करीत असतात, त्याचप्रमाणें हे अर्थशास्त्रज्ञ द्रव्यलाभांतूनच खरा लाभ मिळवूं इच्छितात. पण द्रव्यलाभ ही खऱ्या लाभाची केवळ छाया आहे. माणुसकीची वाढ हाच खरा लाभ होय, पण तिकडे त्यांचें लक्ष नसतें.

म्हणून पुष्कळ सुखांचा पण चांगल्या प्रकारच्या सुखांचा उपभोग

घेण्यास शिकविणें हाच अर्थशास्त्राचा अंतिम उद्देश आहे. दुसऱ्या शब्दांत बोलावयाचें तर प्रत्येक वस्तूचा उपभोग घ्यावा व तो उदात्तपणें घ्यावा. ती वस्तु द्रव्यरूप असेल किंवा सेवारूप असेल अथवा उत्तम द्रव्य निर्माण करणारे श्रम असतील. प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष केलेली सेवा, असा फरक मिल्नें केला आहे, व त्या आधारें वस्तूची मागणी म्हणजे कामाची मागणी नव्हे, असें विधान त्यानें केलें आहे. मिल्च्या एकंदर ग्रंथातील ही एक विलक्षण चूक असून तिचें मूळ रिकार्डोच्या ग्रंथांतहि आढळतें. विहारोद्यान बनविण्याच्या कामावर लाविलेले मजूर आणि मखमल बनविण्याच्या कामावर लाविलेले मजूर यांच्यांत भेद करून तो म्हणतो कीं, यांपैकीं कोणत्या कामावर मालक त्यांची योजना करील यावर कामगार-वर्गाचें भवितव्य पुष्कळसें अवलंबून असतें. कारण, बागेंतील कामावर नेमणूक केल्यास कामाची मागणी वाढते; पण मखमलीच्या खरेदीनें कामाची मागणी वाढत नाहीं. या विधानांत फार मोठी चूक असून ती तितकीच विलक्षण आहे. मजुरांना मोकळ्या हवेंत विळे चालविण्याचें काम देण्याऐवजीं रोगट हवेंत माग चालविण्याचें काम दिलें, तर त्यांत मजुरांच्या दृष्टीनेंहि फरक आहे, पण तो फरक त्यांच्या खिशांत पडणाऱ्या द्रव्याच्या दृष्टीनें मुळीच नाहीं. त्याला विळा व बीं हातांत देऊन जमिनीवरची हिरवी मखमल बनविण्यास सांगितलें काय, किंवा रेशीम व कात्री हातांत देऊन एकादी तांबडी मखमल बनविण्यास सांगितले काय, दोन्ही कामें द्रव्यदृष्ट्या त्याला अगदीं सारखींच वाटतील. तसेंच ही मखमल बनविल्यानंतर आम्ही तिच्यावर सहल करून तिचा उपभोग घेतला किंवा ती अंगावर पेहेरून तिचा उपभोग घेतला, तरी आमचा उपभोग जोंपर्यंत स्वार्थीच असेल, तोंपर्यंत त्याच्या दृष्टीनें त्यांत कांहींहि फरक पडणार नाहीं. पण आमचा उपभोग हा जर कोणत्याहि प्रकारें निःस्वार्थी होणार असेल, तर मात्र केवळ आमच्या उपभोगाचा प्रकारच नव्हे तर आमच्या उपभोग्य वस्तूचें स्वरूपहि त्याच्या दृष्टीनें महत्त्वाचें ठरेल. केवळ तात्कालिक वेतनदृष्टीनें विचार केल्यास मी मजुराला फळबाग करण्याच्या कामावर नेमिलें काय अथवा बॉंब करण्याच्या कामावर नेमिलें काय, त्याला कांहीं फरक वाटणार नाहीं, पण या पदार्थांचा उपभोग घेण्याचा माझा जो संभाव्य प्रकार

असेल, त्यामुळें मात्र त्याच्यावर महत्त्वाचे परिणाम घडूं शकतील. दोहोंचाहि उपभोग मी स्वतः घेणार नाहीं असें गृहीत धरल्यास माझ्या उपभोगाच्या भिन्न प्रकारांचे अंतिम परिणाम त्याच्यावर अगदीं भिन्न होऊं शकतील. त्याचें मूल आजारी पडलें असतां त्याच्या घरी जाऊन मी मुलाला तीं फळे देईन, की त्याच्या घरावरील धुराड्यांतून त्यानें बनविलेला बॉंब फेकून मी त्याचें छप्पर उडवून देईन, हे प्रश्न त्याच्या-दृष्टीनें खास महत्त्वाचे आहेत.

त्या शेतकऱ्याच्या दृष्टीनें अत्यंत भयंकर गोष्ट म्हणजे फळें पिकविल्यास मालक त्यांचा उपभोग स्वतः घेईल व बॉंब बनविल्यास त्यांचा प्रयोग तो इतरांवर करील ही होय.* पण कांही झालें तरी बॉंबचा उद्देश सफल

---

* अन्यायी युद्धांना साहाय्य केवळ भांडवलशाही संपत्तीमुळेंच मिळूं शकतें, हा एक युरोपीय संपत्तीच्या अनेक परिणामांपैकीं अत्यंत भयंकर परिणाम आहे. न्याय्य युद्धांना इतक्या द्रव्याचें साहाय्यच लागत नाहीं; कारण न्यायासाठीं जे लढतात त्यांपैकीं पुष्कळसे मोफत लढण्यासहि तयार असतात. पण युद्ध अन्यायी असलें म्हणजे मनुष्यांच्या देहाप्रमाणें त्यांचे आत्मेहि विकत घ्यावे लागतात व त्यांच्यासाठीं लागणारीं उत्कृष्ट शस्त्रास्त्रेंहि विकत घ्यावीं लागतात. यामुळें अशीं युद्धें अत्यंत महाग बनतात. त्यांच्यामुळें, सामान्य जनतेला क्षणभरहि मानसिक शांतता लाभावी यासाठीं पैसा खर्च करण्याइतका प्रामाणिकपणा किंवा औदार्य या राष्ट्रांपाशीं आज दिसत नाहीं, उलट परस्परांसंबंधींची हीन भीति, अविश्वास व क्रोध यांची उत्पत्ति करण्यांत हीं राष्ट्रें किती पैसा खर्च करीत असतात हें मात्र बोलावयासच नको. उदाहरणार्थ, आज इंग्लंड व फ्रान्स हे एकमेकांपासून एकमेकांस वाटणारी भीति विकत घेण्यासाठी दरसाल एक कोटि पौंड खर्च करीत असतात. शिवाय सर्व प्रकारचीं अन्याय्य युद्धें चालविण्यास लागणारा पैसा शत्रूंना लुटून, नाहींतर भांडवलदारांचें कर्ज काढून उभारावा लागतो व अखेरीस या कर्जाची फेड करण्यासाठीं सामान्य जनतेवर कर लादावे लागतात. युद्धें करण्याच्या व चालविण्याच्या बाबतींत मात्र जनतेच्या मताला मान न मिळतां फक्त भांडवलदारांच्या

व्हावयाचा तर कोणाचें तरी छप्पर उडविलें जाणार, हें सामान्यतः खरेंच आहे. आपल्या शेजाऱ्यासाठीं तुम्ही वाटल्यास द्राक्षांचे मळे लावाल किंवा बंदुकीच्या गोळ्यांचे कारखाने काढाल. विनिमयशास्त्राच्या नियमानुसार तोहि तुमच्यासाठी द्राक्षें किंवा बंदुकीच्या गोळ्या निपजवील; आणि तुम्ही दोघेंहि आपापल्या कर्मांचीं फळें भोगाल.

म्हणून उत्पादनाची खरी कसोटी, उपभोगाचे प्रकार आणि परिणाम, हीच आहे. अधिक कष्टानें मालाची निपज करणें येवढ्यानेंच उत्पादनाचें कार्य होत नसून मालाचा योग्य उपभोग घेणें हेंच खरें उत्पादन होय, आणि राष्ट्रापुढील खरा प्रश्नहि तेथें किती लोक खपत आहेत हा नसून किती जीवनशक्ति निर्माण होत आहे हा असतो. कारण उत्पादनाचा उद्देश व परिणाम जसा उपभोग हा आहे, तसा उपभोगाचा उद्देश व परिणाम जीवन हाच आहे.

हा विषय दोन महिन्यांपूर्वी मी वाचकांपुढें मांडून तसाच सोडून दिला. हेतु असा की, त्याचें उत्तर स्वतः स्पष्टपणें न सांगतां वाचकांनींच तें आपल्या बुद्धीनें शोधून काढावें. पण आतां पार्श्वभूमि पुरेशी तयार झाली आहे. ( येथें सूचित केलेल्या विषयांची तपशीलवार चर्चा करणें मासिकांत शक्य नाही. ती दुसरीकडे करणें भाग आहे. ) मात्र या प्राथमिक निबंधांचा समारोप करण्यापूर्वी एक महत्त्वाचा सिद्धांत स्पष्टपणें मांडण्याची माझी इच्छा आहे. **जीवनाव्यतिरिक्त दुसरी कोणतीहि संपत्ति नाहीं.** येथें जीवन या शब्दांत प्रेम, आनंद, कौतुक इत्यादी जीवनाच्या सर्व शक्तींचा समावेश केलेला आहे. ज्या देशांत उदात्त व आनंदी मानवप्राण्यांची मोठ्यांत मोठी संख्या नांदत असते तोच देश सर्वांत अधिक समृद्ध होय. तसेंच आपल्या जीवनाच्या सर्व शक्तींचा ज्यानें

---

इच्छेमुळेंच तीं सुरू होतात व चालतात. तथापि युद्धाचें खरें कारण सर्व राष्ट्राच्या अंतःकरणांतील लोभ हेंच असल्यानें त्या वृत्तीच्या वाढीनें राष्ट्रांतील श्रद्धा, सत्यनिष्ठा व न्यायबुद्धि यांचा ऱ्हास होतो व अखेरीस त्याचीं फळें सर्वांसच भोगावीं लागून योग्य वेळीं प्रत्येकास नुकसान व शिक्षा सोसावी लागते.

पूर्ण विकास केला आहे व आपल्या शीलानें व संपत्तीनें जो इतरांच्या जीवनाचा विकास करण्यास सहाय्यभूत होत आहे, तोच खरा श्रीमंत मनुष्य होय.

मोठें विलक्षण अर्थशास्त्र दिसतें हें ! तथापि आजपर्यंत जीं जीं अर्थशास्त्रें निर्माण झालीं अथवा पुढें होतील, त्या सर्वांत हेंच एक खरें अर्थशास्त्र आहे. याच्या उलट, स्वार्थाच्या आधारावर रचिलेलीं सर्व अर्थशास्त्रें म्हणजे ज्यामुळें स्वर्गीय साम्राज्यांत द्वैत निर्माण झालें व स्वर्गीतील सुव्यवस्थेचा अंत झाला, अशा आसुरीवृत्तीचा परिपाकच होय.

" उदात्त व आनंदी मानवप्राण्यांची मोठ्यांत मोठी संख्या " असें वर म्हटलें. पण मोठी संख्या आणि उदात्त जीवन हीं परस्परांशीं सुसंगत आहेत काय ? होय, केवळ सुसंगतच नव्हे तर मोठी संख्या उदात्त जीवनास आवश्यकच आहे. अधिकतम जीवन हें अधिकतम सद्गुणांमुळेंच शक्य होणारें आहे. जीवनसंख्येच्या बाबतींत प्राणिजीवनाहून मानवीजीवनाचा सिद्धांत अगदीं भिन्न आहे. मानवेतर प्राण्यांची संख्या फक्त अन्नाचा तुटवडा आणि निरनिराळ्या प्राणिकोटींचा परस्पर कलह यांनींच मर्यादित होत असते; किड्यांची संख्या चिमण्यांच्या भुकेनें आणि चिमण्यांची संख्या किड्यांच्या कमतरतेनेंच मर्यादित होत असते. केवळ प्राणि याच दृष्टीनें मनुष्याचा विचार केल्यास त्यालाहि हेच नियम लागू पडतात. भूक, रोग, युद्धें याच गोष्टी त्याच्या संख्यावृद्धीला मर्यादा घालूं शकतात व आजपर्यंत याच मर्यादा प्रभावी ठरलेल्या आहेत. आजपर्यंत त्यानें आपलें सर्व श्रेष्ठ कौशल्य दुष्काळांची वृद्धि कशी करावी, रोगांचें बीं कसें पेरावें आणि तरवारीचा प्रभाव कसा गाजवावा, या कामींच खर्च केलें असून आपला व आपल्या घरादारांचा नाश करण्याच्या विद्येचाच अभ्यास त्यानें मुख्यतः केलेला आहे. पण इतर प्राण्यांहून श्रेष्ठ या दृष्टीनें मनुष्याचा विचार केल्यास त्याच्या लोकसंख्येचें नियंत्रण या नियमांनीं होऊं नये असें दिसून येईल. त्याच्या अंगीं जितकें नीतिधैर्य व जितकें प्रेम असेल त्यावरच त्याच्या संख्येची मर्यादा अवलंबून राहील. या दोहोंनाहि मर्यादा आहेत व असल्याच पाहिजेत, त्याचप्रमाणें त्याच्या

लोकसंख्येलाहि मर्यादा आहे. पण ही मर्यादा अद्यापि गांठली गेलला नाहीं व अनेक युगेंपर्यंत ती गांठली जाणारहि नाहीं.

लोकसंख्येच्या प्रश्नावर अर्थशास्त्रज्ञांनीं जितके उदासवाणे विचार व्यक्त केलेले आहेत, तितके मानवी विचारांच्या कोणत्याहि क्षेत्रात मला आढळलेले नाहींत. मजुराना अधिक वेतन देऊन त्यांची स्थिति सुधारावी अशी सूचना कोणी केली की अर्थशास्त्रज्ञ म्हणतील, " छे, छे, तुम्ही जर त्यांचा पगार वाढविला, तर त्यांची संतति वाढेल व तिच्यामुळें त्यांची राहणी पूर्वी-इतकीच हीन होईल, नाहींतर अधिक मिळणारें वेतन ते दारूबाजींत उडवून टाकतील. " त्यांना तसें करावेंसें वाटेल, हें मलाहि मान्य आहे, पण असें वाटावयास त्यांना कोण शिकवितें ? समजा की, आपल्या स्वतःच्याच मुलासंबधीं तुम्ही मला म्हणूं लागलांत की " मी त्याला आपल्या कपनींत घेण्यास धजत नाही, कारण मीं तसें करीन तर तो दारुडा बनून मरून तरी जाईल किंवा आपल्या गांवांत अर्धा डझन पोरांची तरी भर टाकील. " तर मी त्यावर तुम्हास असें विचारीन कीं, " तुमच्या मुलांत या प्रवृत्ती कोणापासून उतरल्या ? त्या त्याच्या अंगीं आनुवंशिकतेनें आल्या की, शिक्षणामुळे आल्या ? यापैकीं कोणत्या तरी एका मार्गानेंच त्या आल्या असल्या पाहिजेत." हा न्याय जसा तुमच्या मुलास लागू पडतो, तसाच तो देशांतील गरिबांनाहि लागू पडतो. एक तर हे सर्व गरीब आमच्याहून भिन्न वंशाचेच असले पाहिजेत, व म्हणून त्यांचा उद्धार करणें अशक्य असेल. ( हें मत पुष्कळ लोक सूचित करीत असले तरी त्याचा उघड पुरस्कार केल्याचें माझ्या ऐकिवात नाहीं ). नाहींतर ज्या दक्षतेनें आमचें संवर्धन करण्यांत आलें त्याच दक्षतेनें त्यांचेंहि संवर्धन केल्यास, ते आमच्या इतकेच संयमी व निर्व्यसनी—शहाणे आणि निर्विकार—अथवा अनुकरणीय आदर्श बनतील. यावर असें म्हणण्यांत येतें कीं " या सर्वांना शिक्षण मिळणें शक्य नाहीं." तें का बरें ? हाच तर वादाचा मुख्य मुद्दा आहे. उदार वृत्तीच्या लोकांना वाटतें की, गरिबांना अन्न मिळूं देत नाहींत, हाच श्रीमंतांचा सर्वांत मोठा दोष आहे; 'लुच्चेगिरीनें आमच्यापासून लपवून ठेविलेलें अन्न आम्हांला दे,' अशी

प्रार्थना जनताजनार्दनाकडे गरीब लोक करीत असतात. अरेरे ! अन्न मिळूं न देणें हाच सर्वांत निष्ठुर अपराध नव्हे, आणि अन्नासंबंधींचा हक्क, हाच सर्वश्रेष्ठ न्याय्य हक्क नव्हे. जीवन हें अन्नाहून श्रेष्ठ आहे. श्रीमंत हे गरिबांना केवळ अन्नच मिळूं देत नाहींत असें नव्हे, तर ते विद्या, सद्गुण, मोक्ष हे सर्वच त्यांना मिळूं देत नाहींत. मेंढपाळ-विरहित मेंढरांनो, तुम्हांला केवळ तुमच्या कुरणापासूनच दूर ठेवण्यांत आलेलें नसून तुमच्या पालक प्रभूपासूनच तुम्हांला दूर ठेवण्यांत आलेलें आहे. अन्न ! कदाचित् या हक्काचीहि शाबिती करणें अवश्य असेल, पण त्याच्या आधीं पुष्कळ इतर हक्कांचीहि शाबिती करावी लागणार आहे. तुमची इच्छा असेल तर श्रीमंताच्या ताटांतील तुकड्यावरहि तुमचा हक्क सांगा, पण तो कुत्र्याप्रमाणें सांगूं नका, तर पोटच्या मुलाप्रमाणें सांगा. आपल्या पोटास अन्न मिळालें पाहिजे, हा हक्क सांगाच पण पवित्र, पूर्ण आणि शुद्ध बनण्याचा आपला हक्क त्याहूनहि अधिक उच्च स्वरानें घोषित करा !

कामकरी लोकांसंबंधीं योजिलेलीं ही विशेषणें मोठीं विलक्षण वाटतात ! "म्हणे पवित्र ! मोठमोठे झगे घातल्यावांचून आणि केसांना तेलें चोपडल्यावांचून पवित्र बनणार ! फाटकेतुटके कपडे घालणारे व वेडेवांकडे शब्द बोलणारे आणि गलिच्छ कामें करणारे हे लोक, म्हणे पवित्र बनणार ! पूर्ण ? डोळ्यांत तेज नाहीं, शरीराला वाढ नाहीं, डोक्यांत कांहीं लवकर शिरत नाही, आणि म्हणे पूर्ण बनणार ! शुद्ध इंद्रियलोलुप आणि हीन वृत्तीचे हे लोक म्हणे शुद्ध बनणार ! मलिन अंगाचे आणि गलिच्छ मनाचे हे लोक शुद्ध बनणार !" होय, ते तसे असतीलहि; तथापि आज पृथ्वीवर जे लोक नांदत आहेत त्या सर्वांत ते अधिक पवित्र, अधिक पूर्ण आणि अधिक शुद्ध आहेत. तुम्ही वर्णन* करतां तसे ते असतीलहि पण त्यांना तसें ज्यांनीं ठेविलें त्या आम्हापेक्षां ते अधिक पवित्र आहेत.

"पण त्यांची सुधारणा आम्हांस कशी करतां येणार ? त्यांना कपडेलत्ते व विद्यादान कोण करणार ? संयमाचा मार्ग दाखवून त्यांना संततिनियमन कोण शिकविणार ? एकमेकांना खाऊन जगण्यापेक्षां त्यांना दुसरें कोणतें भवितव्य असणार ?"

मला अशी आशा आहे कीं, त्यांना दुसरें भवितव्य आहे; मात्र अर्थशास्त्रज्ञ सामान्यतः लोकसंख्यानियंत्रणाला जे तीन उपाय सुचवितात त्यांनीं तें प्राप्त होणार नाहीं.

हे तीन उपाय थोडक्यांत असे आहेत: वसाहती वसवाव्या, पड-जमिनी लागवडींत आणाव्या आणि लोकांना विवाहापासून परावृत्त करावें.

पहिल्या व दुसऱ्या उपायामुळें तो प्रश्न केवळ पुढें ढकलला जातो किंवा त्याला उत्तर देण्याचें टाळतां येतें. सर्व जगभर वसाहती वसण्यास आणि त्यांतील सर्व रानें लागवडींत येण्यास दीर्घ काळ लागेल हें खरें आहे. पण वसाहती करण्यालायक जमीन जगांत किती आहे हा मूलभूत प्रश्न नसून वसाहतीलायक अशा जमिनीच्या विशिष्ट प्रदेशावर किती लोकांची उपजीविका होणें अवश्य आहे, हाच प्रश्न महत्त्वाचा आहे.

लक्षांत घ्या कीं, किती लोकांची उपजीविका होणें अवश्य आहे असें मी म्हणत आहें, किती लोक जगणें शक्य आहे, असें म्हणत नाहीं. ढोबळ विधानें करण्याच्या आपल्या संवयीस अनुसरून 'वेतनाचा नैसर्गिक दर' किती असावा, याचें विवेचन करतांना रिकार्डो म्हणतो, "ज्यामुळें मजुराचा गुजारा होऊं शकेल तितका." "गुजारा होऊं शकेल तितका?" होय, पण कोणत्या स्थितींत हा गुजारा व्हावयाचा? एका कामकरी मुलीला हा उतारा वाचून दाखवितांच तिनें तात्काळ वरील प्रश्न मला विचारला. तिचाच प्रश्न मी थोडा अधिक विशद करतों. "त्याचा गुजारा कसा व्हावा? त्याची आयुर्मर्यादा किती असावी? ज्यांचें पोट भरावयाचें त्यांच्यापैकीं कितींनी वृद्ध व्हावयाचें, व कितींनीं तरुण-पणींच मरावयाचें? म्हणजे कमी अन्नामुळें मरणाऱ्या मुलांसुद्धां सर्वांचें सरासरी आयुर्मान तीस किंवा पसतीस इतकेंच पडावें काय? त्यांना लवकर मारावें अशा रीतीनें त्यांच्या उपजीविकेची व्यवस्था तुम्ही करणार काय? कीं निसर्गानें दिलेलें सर्व आयुष्य त्यांना भोगतां येईल, अशा प्रकारें त्यांची व्यवस्था लावणार?" पहिल्या प्रकारची व्यवस्था लाविली तर त्यांच्या पिढ्या थोड्या काळांत अधिक होतील व अधिक लोकांची व्यवस्था लागेल; पण दुसऱ्या प्रकारें ती व्यवस्था लाविल्यास लोक अधिक सुखी होतील. रिकार्डोच्या मतानुसार यांपैकीं नैसर्गिक अवस्था ती कोणती? व वेतनाचा

नैसर्गिक दर कोणत्या अवस्थेस अनुरूप समजावयाचा? तसेंच ज्या जमिनीच्या तुकड्यावर आळशी, अज्ञानी व उधळे असे दहाच लोक उपजीविका करूं शकतील, त्याच तुकड्यावर उद्योगी व हुषार असे तीस किंवा चाळीस लोक आपले पोट भरूं शकतील. यापैकीं त्यांची नैसर्गिक अवस्था कोणती व त्यांच्या वेतनाचा नैसर्गिक दर हा कोणत्या अवस्थेस अनुरूप असावयाचा ?

शिवाय, एका जमिनीच्या तुकड्यावर चाळीस उद्योगी पण अज्ञानी लोक आपलें पोट भरीत आहेत असें समजा. पुढें त्यांना आपल्या अज्ञानाचा कंटाळा येऊन त्यांनीं खगोलविद्येचें व भूमितीचें ज्ञान करून घेण्यासाठीं आपल्यापैकीं दहा लोकांची नेमणूक केली. या दहा लोकांचे श्रम जमीन पिकविण्याच्या कामीं लागणार नसल्यानें, एकतर या संक्रमण-कालांत धान्याची निपज दुसऱ्या कांहीं उपायानें वाढली तरी पाहिजे, किंवा या दहा लोकांनी उपाशी तरी राहिलें पाहिजे, अथवा त्याच्यासाठी दुसऱ्या कोणीतरी उपासमारीस तयार असलें पाहिजे. अशा शास्त्र-संशोधकांच्या श्रमांचें नैसर्गिक वेतन कोणतें? त्यांच्या श्रमांमुळें संक्रमण-कालांत अथवा नंतर जें उत्पादनप्रमाण वाढेल, त्याच्याशी त्यांच्या वेतनाचें प्रमाण कसें पडेल ?

त्याचप्रमाणें या जमिनीवर शांतताप्रिय व पुण्यशील अशा चाळीस लोकांचा निर्वाह प्रथम होत असला, तरी पुढें ते इतके कलहप्रिय व पापी बनले की, त्यांचे तंटे तोडण्याच्या व त्यांचा विचार करण्याच्या कामावर पांच लोकांची नेमणूक करणें त्यांना भाग पडलें, असें समजा. त्यांनी केलेल्या निर्णयांची बजावणी करण्यासाठीं दहा लोक शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज ठेवणें भाग पडलें आणि प्रत्येकास परमेश्वराच्या अस्तित्वाची जाणीव बोधप्रद भाषेंत करून देण्यासाठी पाच लोक नेमावे लागले, तर या सर्व गोष्टींचे त्यांच्या उत्पादनावर काय परिणाम घडतील आणि बुद्धीचीं, शरीराचीं व वाणीचींहि कामें करणाऱ्या निरनिराळ्या लोकांची नैसर्गिक वेतनें काय ठरतील ?

हे सर्व प्रश्न रिकार्डोच्या अनुयायांनी सोडवावेत किंवा ते तसेच सोडून द्यावेत, असें सुचवून मिल्लनें कामकरी वर्गाच्या भवितव्यासंबंधीं जी अस्पष्ट

कल्पना मांडली आहे तिच्याबद्दल कांहीं महत्त्वाच्या गोष्टी मी सांगतों. त्याच्या ग्रंथाच्या या व त्याच्या मागच्या प्रकरणांतील विवेचन अर्थशास्त्रज्ञांच्या नेहमींच्या लिखाणाहून बरेंच भिन्न आहे; कारण त्यांत नैसर्गिक सौंदर्याची हानि होत असल्याबद्दल विषाद प्रदर्शित केला असून सृष्टिसौंदर्याला मूल्य असतें हें मान्य करण्यांत आलें आहे. पण या बाबतींत आपण फारशी चिंता करण्याचें कारण नाहीं. विशिष्ट भूप्रदेशावर जास्तींत जास्त लोकसंख्या किती नांदू शकेल याचा विचार करूं लागलें की, त्या मनुष्यांना व त्यांच्या जनावरांना खाण्यास लागणाऱ्या वनस्पतींची जास्तींत जास्त निपज करण्याचा विचार करावाच लागतो. त्यांच्यासाठी शुद्ध हवेची व शुद्ध पाण्याची अधिकात अधिक सोय करण्याचा अंतर्भाव त्यांत होतोच, म्हणून हवा शुद्ध राखण्यासाठीं भरपूर रानें व प्रवाहांना समृद्ध करणाऱ्या दऱ्या यांची आवश्यकता असते. तसेंच तेथील पाण्याचे प्रवाह प्रखर उन्हानें शोषून जाऊं नयेत यासाठीं या दऱ्याखोऱ्यांत झाडेंहि राखावीं लागतात. इंग्लंडसारख्या एकाद्या देशाला तशी इच्छा असेल तर एकाद्या कारखानदारी शहराचें रूप धारण करतां येईल; आणि मानवजातीच्या कल्याणासाठीं म्हणून सर्व इंग्रज लोकांना गोंगाट, अंधार आणि विषारी उच्छ्वासवायु अशा वातावरणात राहून अल्पायूहि होता येईल. पण सर्व जगाला कारखान्याचें किंवा खाणीचें स्वरूप येणें अशक्यच आहे. लोक लोभाला किंवा क्रोधाला कितीहि वश झाले तरी त्यांचें पोट शेतीवांचून भरू शकत नाहीं; कितीहि शोध लागले तरी जनतेला लोखंड खाऊन जगता येणार नाहीं किंवा हैड्रोजनचा पेयासारखा उपयोग करता येणार नाहीं आजच्या घटोत्कची मायेच्या बाजारांतील पदार्थ कितीहि मोहक असले तरी जोंपर्यंत लोकांना खाण्यास भाकरी लागत आहे, तोंपर्यंत सुवर्णकिरणांनीं आच्छादिलेल्या दऱ्या माणसांना सुंदर वाटतील आणि विहिरी व गुऱ्हाळें यांच्या सान्निध्यांत लक्षावधि प्राणी आनंदांत नाचत-बागडत राहतीलच.

आमच्या भावनावश अर्थशास्त्रज्ञांना अशीहि भीति वाटण्याचें कारण नाहीं कीं, यांत्रिक शेतीचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर होऊन हीं रानें नाश पावतील. शहाणे लोक जेथें असतील तेथें अन्नाप्रमाणें सुखाचाहि

शोध होत राहणारच आणि भूप्रदेश मनुष्यांनीं गजबजलेला पाहण्यांत जो आनंद होतो, तो चाखण्याचें शहाणपण असल्याखेरीज कोणत्याहि समाजाची लोकसंख्याहि वाढत राहणार नाहीं. रानांनाहि एक विशिष्ट स्थान आहे व त्यांचेंहि विशिष्ट कार्य आहे. सृष्टि हें एक सनातन इंजिनच आहे. पृथ्वीचा कणा हा त्याच्या चक्राचा कणा आहे; तिचें वर्ष हा त्याचा फेरा आहे आणि समुद्र हें त्यांतील पाणी आहे. या यंत्राच्या फेऱ्यामुळें न नांगरतां येणारे खडक आणि वाळूच्या मैदानांनीं वेष्टिलेले प्रदेश, धुक्यानें व उष्णतेनें ओसाड बनलेले राहणारच; पण त्यांच्या दरम्यानचे जे प्रदेश मनुष्यवस्तीस योग्य असतील, तेच खरे सुंदर दिसतील. अंतःकरण ज्याची वासना धरतें, तेंच डोळ्यांनाहि सुंदर दिसतें. आनंदी मानवी श्रमानें जो समृद्ध बनलेला नाहीं, नांगरटीनें जेथील जमीन मऊ बनलेली नाही, बागांनी ज्याला शोभा आलेली नाहीं, फळझाडांनीं जो भारावलेला नाहीं, मनुष्यवस्तीच्या घरांनी जो साफसूफ आणि आकर्षक बनलेला नाहीं आणि सजीव सृष्टीच्या ध्वनींनी जो निनादत नाहीं, असा कोणताहि सृष्टीचा देखावा सतत पाहिल्यास कंटाळवाणा झाल्याखेरीज राहणार नाही. अगदीं निःशब्द असें वातावरण सुखद वाटत नाहीं; जेव्हां त्यांत पक्ष्यांचें संगीत भरलेलें असतें, किड्यांचे ध्वनी मिसळलेले असतात, मनुष्याचे आवाज ऐकूं येतात आणि मुलांची अकारण गडबड कानांवर येते, तेव्हांच तें रम्य वाटतें. जीवनाची कला जसजशी अवगत होत जाईल, तसतसें असें समजून येईल कीं, सर्व सुंदर वस्तू जीवनास आवश्यकच आहेत. दक्षतेनें वाढविलेलें धान्य जितकें अवश्य आहे, तितकेंच ओढ्याच्या कांठीं उगवलेलें रानफूलहि आवश्यक आहे आणि घरीं पाळलेलीं जनावरें जितकीं आवश्यक आहेत तितकीच रानांतील पशुपक्ष्यांचीहि आवश्यकता आहे. कारण मानवी जीवनास केवळ भाकरीचीच आवश्यकता आहे असें नाही, तर त्याला वनचर सृष्टीचीहि आवश्यकता आहे. परमेश्वरी सृष्टींतील प्रत्येक अज्ञेय कृति आणि कौतुकास्पद ध्वनि यांचीहि मानवी जीवनास गरज आहे. त्यांचा उपयोग आपणांस व आपल्या पूर्वजांस समजला नाहीं हें पाहूनहि त्याला आनंद होत असतो आणि

आपल्या चैतन्यासारखेंच चमत्कृतिजनक तत्त्व अनंत आसमंतात् भरून राहिलें आहे या विचारानेंहि त्याला आनंद वाटत असतो.

अखेरीस हेंहि लक्षांत ठेवा की, मानवजातीच्या या श्रेष्ठ आनंदाच्या प्राप्तीचा खरा मार्ग वैयक्तिक प्रयत्नांनींच सांपडूं शकेल. सामुदायिक प्रयत्नांनीं तो सांपडणार नाही. कांहीं सार्वजनिक कृत्यांनी या प्रगतीला साहाय्य होऊं शकेल, व कायद्यातील काही सुधारणांमुळें प्रगतीची दिशा समजूं शकेल. पण यासाठीं सामुदायिक स्वरूपाचे जे उपाय किंवा जे कायदे अमलांत यावयाचे, ते प्रत्येक कुटुंबांत प्रथम स्वयप्रेरणेनें अमलांत आलेले असेच असावे लागतील. (हीन स्थितींत असलेल्या लोकांना उपदेश करतांना) " ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें। चित्ती असो द्यावें समाधान ॥" हा उपदेश आपल्या शेजाऱ्यांस लोक करीत असल्याचें आपण रोज ऐकतों. अशा कांहीं अवस्था कदाचित् असतील कीं, ज्यात समाधान मानून रहावें असा परमेश्वराचाहि हेतु नसेल. तथापि वरील वर्तनसूत्र हें सामान्यतः चांगलें आहे, पण तें स्वतः—स्वतःच्या कुटुंबांत—अमलांत आणण्यासाठीं विशेषेंकरून आहे. तुमच्या शेजाऱ्यानें आपल्या परिस्थितींत समाधान मानून रहावें किंवा राहूं नये, हा तुमचा प्रश्न नाहीं. पण तुम्ही मात्र आपल्या स्थितींत समाधान मानून रहावें हें तुमचें काम आहे. आज इंग्लंडांत जर कोणत्या एका गोष्टीची अत्यंत आवश्यकता असेल तर ती म्हणजे व्यवस्थित व सतत काम करण्याची पात्रता अंगीं आणून नम्रपणानें, उघडपणानें आणि कष्टानें जीवित कंठिल्यास किती सुख प्राप्त करून घेतां येतें तें दाखवून देण्याचीच होय. जगांत आपलें वैभव वाढविण्याचा भार परमेश्वरावर टाकून जे संसारांत सुखानें नांदूं इच्छितात, ज्यांना अधिक संपत्तीचा अभिलाष नाहीं पण जे साधेपणांतील सुखाचे चहाते आहेत, ज्यांना मोठें वैभव नको असून जीवनांतील गाढ आनंद हवा आहे, ज्यांना इतर स्वामित्वाआधीं स्वतःवरील स्वामित्वाची आकांक्षा आहे आणि अनपकारी स्वाभिमान व शांत संतोष बाळगून काम करण्यांत ज्यांना सन्मान वाटतो, असे आदर्श नागरिक आज आम्हांस हवे आहेत.

या साधेपणांत आढळणाऱ्या शांततेचें वर्णन करतांनाच 'न्याय-व

शांतता यांचें एकमेकांशीं मीलन झालें आहे ' असें बायबलमध्यें म्हटलें आहे. ' जे शांतता निर्माण करतात तेच न्यायाचें बीजारोपण करीत असतात' असें म्हटलें आहे, तेंहि याच शांततेसंबंधीं होय. हे शांततानिर्माते, म्हणजे जे तंटे मिटवितात ते नव्हेत, तर जे शांततेची निर्मिति करितात म्हणजे समाजांत संतोषवृत्ति फैलावतात, तेच होत. अर्थात् तंटे मिटविण्याचें कार्यहि यांत येतेंच. पण ही संतोषवृत्ति प्रथम आपण संपादन केली नाहीं तर ती फैलावतांहि येणार नाही. तसेंच आजच्या जगांत रूढ असलेले कोणतेहि व्यवसाय करून ही संतोषवृत्ति संपादन करितां येईल असें नाहीं. आजच्या समाजांतील कोणताहि व्यवसाय किंवा धंदा घेतला तरी त्यापासून संतोषाचा लाभ होण्याचा संभव कमीच. कारण व्यापारधंद्यांत पडलेले लोक बहिरीससाण्यासारख्या हिंस्र पक्ष्याप्रमाणें स्पर्धा व असूया वृत्तीनें जगभर भटकत असतात. याच्या उलट, फळें खाणाऱ्या पक्ष्यांना व गर्भवती पक्षिणींना जसें घरट्यांचें आकर्षण असतें, तसेंच संतोषवृत्तीचे लोक शांततेचें गृहजीवनच पसंत करतात. ज्ञानदेवतेलाहि मंदिर आहे व त्याला सात स्तंभ आहेत असें वर्णन आहे. तिचा बराच काळ प्रवेशद्वारीं जात असतो व जेव्हा ती संशोधनार्थ सहल करण्यास निघते, तेव्हांहि तिचे मार्ग शांततेचेच असतात.

आमच्या दृष्टीनें तरी तिचें कार्य प्रवेशद्वाराच्या आत आल्यावरच सुरू व्हावयास हवें. कारण सर्व खरें अर्थशास्त्र हें गृहव्यवस्थाशास्त्रच आहे. हें शास्त्र कडक, संयमी आणि उदार बनवा. कशाचाहि अपव्यय करू नका आणि कशालाहि हात आखडूं नका, तो उदार ठेवा. फाजिल पैसे मिळविण्याची फिकीर करू नका, पण पैशाचा सद्व्यय करून त्याचाच अधिक उपभोग घेण्यास दक्षतेनें शिका. ' जें एकाला मिळालें तेंच दुसऱ्याला मिळूं शकणार नाहीं ' हा अर्थशास्त्राचा अगदीं साधा, अगदी उघड, अगदी अपरिहार्य व सर्वांत मोठा सिद्धांत नित्य लक्षांत ठेवा. सर्व अर्थशास्त्राला आधारभूत असा हा सिद्धांत आहे. कोणत्याहि द्रव्याचा एक कणहि आपण उपभोगिला अथवा त्याचा उपयोग केला कीं तितकी समाजाची जीवनशक्ति खर्ची पडली याची जाणीव ठेवा. म्हणून त्या उपभोगामुळें तितकीच जीवनशक्ति बचावणार असेल अथवा

अधिक निर्माण होणार असेल, तरच तो सद्व्यय झाला; व तसें नसेल तर तितकी जीवनशक्ति नाश पावली, किंवा तिची भावी वाढ खुंटली असा अर्थ होतो. कोणताहि सौदा करीत असतांना आपण ज्या वस्तू विकत घेतों, त्या निर्माण करणाऱ्याची या सौद्यामुळें कोणती अवस्था होणार आहे, त्याचा विचार करा; तसेंच आपण दिलेली रक्कम उत्पादकांच्या दृष्टीनें न्याय्य आहे की नाहीं व तिचा योग्य अंश त्याच्या हातीं पडतो किंवा नाही, याचाहि विचार करा. यानंतर तिसरा विचार असा कीं, आपण जी ही वस्तु विकत घेतली तिचा अन्नदृष्ट्या, आनंददृष्ट्या व ज्ञानदृष्ट्या सदुपयोग कसा करितां येईल आणि चौथा विचार असा करा कीं, तिचा अधिकात अधिक उपयोग त्वरित होण्याच्या दृष्टीनें ती कोणास दिली पाहिजे. आपल्या प्रत्येक व्यवहारांत पूर्ण उघडेपणा व कडक चोखपणा ठेवण्याचा आग्रह धरा. आपलें प्रत्येक काम निर्दोष व सुंदर करा. विशेषतः सर्व विक्रेय वस्तू शुद्ध व चोख असतील, याबद्दल दक्ष रहा. साधेपणातील सुख कसें उपभोगावें, हें समजून घेण्याची व शिकविण्याची कोणतीहि संधि न गमावण्याची दक्षता ठेवा. तसेंच सुखाचें प्रमाण हें उपभोग्य वस्तूंच्या संख्येवर अवलंबून नसून अभिरुचीच्या ताजेपणावर व संयमावर अवलंबून असतें, याचा अनुभव जगाला द्या.

या सर्व गोष्टींचा योग्य व प्रामाणिक बुद्धीनें विचार करून भूतदया व मानवी हक्क याच्या दृष्टीनें जर आपली अशी खात्री झाली कीं, मनुष्य-जातीला निदान आणखी कांही काळ तरी चैनीनें राहणें शक्य नाही, आणि चैनीबरोबरच जगात किती आपत्ति नांदत आहे याची स्पष्ट जाणीव आपणांस झाली, तर चैन करण्यांत गुन्हा नसला तरी तसें करण्याची इच्छा आपणांपैकीं कोणास होईल काय, याचा विचार करा. भावी काळांत जेव्हा सर्वांनाच एकमेकांच्या सहकार्यानें चैन करणें शक्य होईल तेव्हांच निरुपद्रवी व सुखप्रद चैन शक्य होईल: पण आजच्या आपल्या परिस्थितींत केवळ अज्ञानांध मनुष्यांसच चैन करणें शक्य आहे. मनुष्य कितीहि निष्ठुर असला तरी त्यानें आपल्या डोळ्यावर कांतडें ओढल्याखेरीज आपल्या ताटांतील पक्वानें तो आज खाऊं शकणार नाही. हें डोळ्यावरचे कांतडें धिटाईनें दूर करा आणि प्रकाशाकडे पहा. जर जगांतील दलितांचीं दुःखें

पाहून तुमच्या डोळ्यांतील तेज अश्रूंनीं मंद झालें आणि पश्चात्ताप निदर्शक जीर्ण वस्त्रेंच अंगावर परिधान करावीं अशी बुद्धि उदय पावली तर तसेच अश्रू ढाळीत जगभर संचार करा आणि ख्रिस्तानें पेरिलेल्या उपदेशाच्या बीजावर अश्रुजलाचें सिंचन करून त्याचें संगोपन करा. असें कराल तरच कष्ट करण्यास तयार असलेल्या प्रत्येकास अन्न आणि शांति यांचा लाभ होईल आणि दैवी साम्राज्याचा भूतलावर अवतार होईल. जगांतील मानवांचे दुष्ट आणि दलित असे जे दोन तट आज पडले आहेत, ते बुजून जाऊन एका लहानशा कुटुंबांत नांदणाऱ्या कुटुंबीयांहूनहि अधिक पवित्र प्रेमानें ते परस्परांशीं वागूं लागतील आणि त्यावेळीं शांततामय समाजघटना अस्तित्वांत येईल. अशा समाजांतहि दुष्टांचें समाधान झालें नाहीं तरी ते इतरांना त्रास देऊं शकणार नाहींत आणि दलितांना विश्रांति लाभेल.



# आमचें प्रकाशन

● १, २ सत्याचे प्रयोग (खंड १ तृतीयावृत्ति; खंड २ द्वितीयावृत्ति) :
मूल्य प्रत्येक खंडास १ रु.

● ३ खादी-मीमांसा ( सुधारून वाढविलेली दुसरी आवृत्ति ) :
लेखक : बाळूभाई मेहता — मूल्य १॥ रु.

४ स्वराज्य–शिष्टाई : — मूल्य ६ आणे

५ संयम कीं स्वैराचार ? — मूल्य ८ आणे

६ हिंडलग्याचा प्रसाद :
लेखक : काका कालेलकर — मूल्य ९ आणे

● ७ हिंदुधर्माचीं मूलतत्त्वें व पुनर्घटना :
लेखक : एस्. राधाकृष्णन् — मूल्य १ रु.

● ८ उपनिषदांतील दहा गोष्टी ( द्वितीयावृत्ति ) :
लेखक : शंकरराव देव — मूल्य ६ आणे

● ९ विद्यार्थी–जीवन ( द्वितीयावृत्ति ) :
लेखक : श्री. स. महाजन — मूल्य ८ आणे

● १० फिलिपाइन्सच्या स्वातंत्र्याचा इतिहास :
लेखक : त्र्यं. र. देवगिरीकर — मूल्य १ रु.

११ कॉंग्रेसचा इतिहास ( द्वितीयावृत्ति ) :
लेखक : डॉ. पट्टाभि सीतारामय्या — मूल्य २ रु.

१२ समाजवादच कां ?
लेखक : जयप्रकाश नारायण — मूल्य १० आणे

१३ खानबंधूंचा अल्प परिचय :
लेखक : महादेवभाई देसाई — मूल्य ९ आणे